






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








रजतमहोत्सवी वर्ष

सप्टेंबर ६९

मूल्य १॥ रु.

# दीपावली



*****************************

## श्रेयनामावली

ललित वाङमयाचे जादूगार–प्रा. ना. सी. फडके . . पंचाहत्तर नावाद–**अरविंद ताटके** ● अभिनेत्री . . . अहो, आनंदाची वातमी . . . आम्हाला नातू झाला — **अशोक परांजपे** ● प्रचार याने आँखो देखा हाल . . . . आजच्या लोकशाही-तलं हे खरं स्वरूप — **दादुमिया** ● खानदान प्रत्येकानं लग्न केलंच पाहिजे असा हट्ट कां ? — **मोहिनी वर्दे** ● चक्रव्यूह . . . तो धोकेबाज असूनही ती कशी भाळली ? — **अशोक ज. आघरकर** ● लोहगड ते लंडन. . . . कुशल पाकीटमारांचें ते हस्तलाघव — **द. सी. उर्सेकर** ● बँकांचे राष्ट्रीयोकरण . . . . सामाजिक नियंत्रणे फसवी ठरली — **म. गो. चंद्रचूड** ● 'दीपावली' दिवाळी अंकातील कथा . . . . रजतमहोत्सवानिमित्त खास लेख — **प्रभाकर अत्रे** आणि दीपमाला, आमचेही (एक) मत.

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक : श्री. दीनानाथ दलाल, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४, यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापले. या प्रतीस किंमत १॥ रु.+रजि. पोस्ट ८० पैसे. वार्षिक वर्गणी : दिवाळी अंकासह रु. १५. अंकात प्रसिद्ध झालेली मते ही चालकांचीही अधिकृत मते असतातच असे नाही.  Registered with the Registrar of Newspapers for India under RNNo. 1612/57 DIPAVALI : Dalal Art Studio 42, Kennedy Bridge, Bombay-4.

अनुक्रमणिका





**दलाल आर्ट स्टुडिओ**
४२, केनेडी ब्रीज, मुंबई–४

टेलिफोन : ★ तारेचा पत्ता :
३५७७६५ DALALART

● **वर्गणीदारांस सूचना** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १५ द्वैवार्षिक वर्गणी रु. २५; त्रैवार्षिक वर्गणी रु. ३० **परदेशी वार्षिक वर्गणी** रु. २०

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नावे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास १.५० पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याही महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्यास** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीही तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. दीनानाथ दलाल यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१,खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२, केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


## "इतिहासापासून आपण काय शिकतो तर आपण इतिहासापासून काहीच शिकत नाही"

असं आपल्या नेहमीच्या मिष्किल पद्धतीने शॉ सांगून गेला. शॉच्या ह्या उद्गारात फार मोठे सत्य दडलेले आहे, फार मोठी शोकात्म वेदना-व्यथा दडलेली आहे.

१५ ऑगस्ट १९४७ ला आपला देश ब्रिटिशांच्या गुलामीतून मुक्त झाला आणि गेली वीस-बावीस वर्षे आपण नेमाने त्या दिवशी आपला स्वातंत्र्य दिन श्रद्धेने, नवीन स्वप्ने पहात पहात व पुढच्या वर्षीचा वायदा मनाशी करीत साजरा करीत आलो आहोत. सोहळे होत–होतीलही ! पण त्यामागे उपचारापेक्षा अधिक काहीतरी असावे आणि ते असणे 'आतून' यावे असे स्वाभाविकपणेच वाटते. कारण 'स्वातंत्र्य दिन' हा महान इतिहास-परंपरा-संस्कृति यांचा वारसा लाभलेल्या देशाचा 'वाढदिवस' आहे. देशाचे नुसते वय वाढत नाही. वाढून चालत नाही. वयाबरोबर अस्मिता वाढावी लागते. ती बलदंड व्हावी लागते. तिचे स्वत्व आणि स्वामित्व त्या मातीत ठसावे-उमटावे लागते. मुळे खोल रुजावी लागतात. गेल्या वीस वर्षात आपण असे वाढलो का ? आपले स्वतंत्र व्यक्तित्व ह्या देशी रुजले का ? की कुणाच्या तरी तोंडाकडे वा भृकुटिभंगाकडे पहात पहात आम्ही पावले टाकली ? देशाचे ऐक्य वाढले ? टिकले ? नवी अस्मिता पेटली ? सामर्थ्य सिद्ध झाले ? त्यागाची, बलिदानाची, समर्पणाची, समष्ठीत व्यक्तित्वे विलीन करून टाकण्याची, देशावर असीम प्रेम करण्याची, विविधतेतही एकत्व पाहण्याची, स्वतंत्र राष्ट्रात अत्यावश्यक असलेली भावना बलिष्ट झाली का ? सामान्याला काही वरचा स्तर लाभला का ? व्यक्ति स्वातंत्र्य, विचार-आचार-उच्चार स्वातंत्र्य वाढले की संकोच झाला ? भूमी १५ ऑगस्ट १९५७ ला जी होती तीच राहिली की आम्ही गमावली ? लढून गमावली की राजकारणी डाव हरलो ? हरलो असलो तर त्याबद्दल उरी खंत आहे का ? पुन्हा ते पराभव होऊ नयेत म्हणून आम्ही काही योजना आखल्या का ? भोवती चीन-पाकिस्तानसारखे देश सतत वक्रदृष्टि ठेवून असताना, शस्त्रसज्ज होत असताना आम्ही त्यांच्याच पाठीशी ठाम उभे राहतील अशांची वीण गेल्या वीस वर्षात सतत वाढू दिली ती का ? तिने काही प्रांत पोखरलेले व ते प्रांत लोकशाही व स्वातंत्र्य यांनाच नख लावायला प्रत्यक्ष-परोक्षपणे सहाय्यभूत ठरत असलेले दिसत असताना आम्ही ती प्रगति मानायची का ? उघड उघड बेदिली माजविणारांना आम्ही विविध स्तरात स्वातंत्र्य दिले आणि ह्या देशाला स्थिर शासन देऊ शकणारा प्रबळ आणि संघटित पक्षच आज 'मोडीत' निघतो की काय अशी स्थिति दिसते. संघटना, शासन, पक्षीय ऐक्य, देशाचे हित या सर्वांपेक्षा व्यक्ति मोठी ठरू पहात आहे. इंग्रज सत्ता स्थिर पावले टाकीत पुढे सरकत होती तेव्हा 'त्या' स्वराज्यातले सरदार दरकदार, सेनापति-पुढारी असेच स्वार्थाने पेटले होते. स्वराज्याच्या ध्वजापेक्षा लहान लहान गटांचे ध्वज मोठे-मोलाचे वाटू लागले होते. स्वार्थ, सौदेबाजी, अहंकार, आणि फुटीर वृत्ती यांचा बुजबुजाट झाला व पिसाटांचे व पिसाळांचे पेंढार वाढू लागते तेव्हा ते कुणातरी तिसऱ्या दादाला आवतण ठरते. तत्वाच्या भाषा करणारांनी आपापले चेहरे आरशात पहावेत. म्हणजे भारताच्या फाळणीसकट अनेक पापांचे डाग चेहऱ्यावर व कपड्यांवर दिसतील. आजचे लोकनेते जोवर व्यक्तिश्रेष्ठता, मोक्ष यांवर मात करू शकत नाहीत तोवर नव्या, तेजस्वी प्रतिमा ह्या देशात निर्माण होऊ शकणार नाहीत. "तुम्ही त्याग करीत रहा, आम्ही सत्ता सांभाळीत राहतो, सत्तेच्या मुंजी करीत राहतो, महाल सजवीत राहतो" असे म्हणणाऱ्या नेत्यांच्या आदेशातून चाफेकर, धिंग्रा, सावरकर, भगतसिंग, उधमसिंग, आझाद आणि सुभाष, अरविंद आणि परमानंद अशी तेजस्वी बाळे कशी निर्माण होतील ? साऱ्यांनीच आपापल्या प्रतिमा पुन्हा एकदा ह्या निमित्ताने आरशात पाहून-तपासून घेतल्या पाहिजेत. इतिहासाची पुनरावृत्ति टाळण्यासाठी समर्थ आणि एकसंध, सेवा-त्यागपरायण समाज उभा करण्याची गरज आज पुन्हा निर्माण झाली आहे. ती प्रतिज्ञा ह्या दिनाच्या साक्षीने करू या ! जयहिंद ! जय भारत ! !

**– संपादक**











## आचार्य अत्रे यांच्यासंबंधी

ऑगस्टच्या अंकात 'आचार्य अत्रे : एक दूरचा डोंगर' हा श्री. रवींद्र पिंगे यांचा लेख प्रसिद्ध झाला आहे. आचार्य अत्रे लेखकाला कसे दिसले याचे शब्दचित्र पिंगे यांनी स्पष्टपणे उभे केले आहे. तसे करण्यात अत्रे यांचा अनादर करावा अगर अवहेलना करावी असा पिंगे यांचा मुळीच हेतू नव्हता व नाही. आम्हालाही अत्रे यांच्याबद्दल सतत आदरच वाटत आलेला आहे. पिंगे यांच्या लेखावर आक्षेप घेणारी तसेच स्तुती करणारी अशा दोन्ही प्रकारची अनेक पत्रे आमच्याकडे आलेली आहेत. त्यातील प्रातिनिधिक स्वरूपाची अशी काही पत्रे येथे दिली आहेत.

**—संपादक**

## एक दूरचा डोंगर

स. न. वि. वि.

आपल्या 'दीपावली'च्या ऑगस्टच्या अंकात आचार्य अत्रे 'एक दूरचा डोंगर' या शीर्षकाखाली श्री. रवींद्र पिंगे यांनी अत्रे यांच्या बहात्तराव्या जन्मदिवसाच्या निमित्यांच्या जीवनपटाचे यथायोग्य (?) दर्शन घडविणारे अदृश्य पैलूंचे एक आगळे शब्दचित्र रेखाटले आहे. ते वाचून सखेदाश्चर्य वाटले. कारण आपण 'जुलै'च्या अंकात आचार्य अत्रे यांचे जे व्यक्तीचित्रण प्रसिद्ध केले त्याच मासिकात पिंगे यांचे इतके भोंगळ, विपर्यस्त, वस्तुस्थितीला सोडून लिहिलेले आणि अतिशयोक्तीने भरलेले निखालस खोटे शब्दचित्र प्रसिद्ध व्हायला नको होते. कदाचित् प्र. स. पक्षावर व त्यातील नेत्यांवर आचार्य अत्रे यांनी जी वेळोवेळी टीका केली त्याबद्दलचा आकस आणि डंख मनात धरून पिंगे यांनी हे शब्दचित्र लिहिले असावे.

सदर लेखात श्री. पिंगे यांनी धादांत खोटी विधाने केलेली आहेत हे मी नम्रपणे सांगू इच्छितो. कारण आचार्य अत्रे यांच्या सहवासात मी गेली २८/३० वर्षे वावरत होतो. 'श्यामच्या आई'बद्दल साठे पुढे पस्तावले याला विनबुडाचा आधार. रेल्वे फलाटावरचे उकडलेले वैदे विकत घ्यायलाही त्यांच्याजवळ दिडक्या नसत हे विधानही निखालस खोटे आणि चुकीच्या आधारे लिहिले आहे. त्या काळातही त्यांची मोटार होती व ती ते नेहमी वापरीत असत. आमच्या घरी ते अनेकदा मोटार घेऊन आलेले होते. हाताजवळचे हत्यार म्हणून कम्युनिस्टांना वापरते आणि त्यातून सत्ता आणि संपत्ती जमली हेही विधान केवळ आकसानेच लिहिलेले आहे. कारण आपल्या प्रभावी वाणीने आणि समर्थ लेखणीने त्यांनी एका निवडणुकीत प्र. स. पक्षाला कायमचे गारद केलेले होते, रथी-महारथी पराभूत झालेले होते. त्यांची डिपॉझिटेही जप्त झालेली होती. यासव गोष्टींचा सूड म्हणून पिंगे यांनी वरील विधान केलेले दिसते. सत्ता आणि संपत्ती ही त्यांनी आपल्या 'शिवशक्ती'मधून निर्माण केली होती.

त्यांचा मान गेला, भिंग फुटले समाजवादी कार्यकर्त्यांनी केलेली त्यांची हुर्यो एकत ऐकत मान खाली घालून जळत पोळत त्यांना जावे लागले हे विधान केवळ सूडबुद्धीने लिहिले आहे. लोकप्रियतेच्या आक्रमक लाटांवर आरूढ झालेल्या अत्र्यांना लोकप्रीतीचा दरवाजा कसा काय बंद झाला हे समजत नाही.

वाचन चालूच होते, पण पराभवाने त्यांचे प्राण कंठाशी आले. ते साक्षात् दुभंगले हेही विधान तेवढेच खोटे आहे. ते निवडणुकीत पडले पण त्यांची हिंमत खचली नाही. त्यांनी आपले मन नाट्य क्षेत्राकडे वळविले आणि उत्तमोत्तम नाट्यनिर्मिती केली ही सत्य घटना होती. हिंमत खचलेला माणूस चार सुवाच्य नि सुंदर मराठी ओळी लिहू शकणार नाही. नाट्यनिर्मिती तर दूरच.

संयुक्त महाराष्ट्र निर्मितीनंतर ८/९ वर्षे ते घसरगुंडीला लागले होते, हे विधान कोणत्या आधारावर श्री. पिंगे यांनी केले समजत नाही. कारण संयुक्त महाराष्ट्र निर्मितीनंतरच त्यांच्या वाङ्मय लिखाणाला उधाण आले आणि सर्वोत्तम असे अग्रलेख, मृत्युलेख त्यांच्या 'मराठ्यात' त्याच काळात प्रसिद्ध झाले. 'तो मी नव्हेच', 'बुवा तेथे बाया'—वगैरे गाजलेली नाटके त्याच काळात रंगभूमीवर आली. साहित्य-सहवास साहित्यिकांची वसाहत त्यांच्याच प्रयत्नामुळे फलद्रूप झाली.

समितीला ते विटले-विस्तारा बंद करण्याची घोषणा केली. ती त्यांच्याच अंगाशी आली. पण ते किटाळ त्यांनी प्र. स. पक्षावर ठेवले ही विधाने कशाची द्योतक आहेत ?

जिव्हाळ्याच्या मैत्रीची तहान लागली होती पण ओंजळभर पाणी कुठं मिळेना ही गोष्टही पिंगे यांनी केवळ सूडबुद्धीने लिहिलेली आहे. कारण त्यांच्या घरी सर्व थरातली सर्व प्रकारचे छोटे-मोठे; धनिक-गरीब, वकील, डॉक्टर्स, इंजिनियर्स, साहित्यिक आणि समाजसेवक असे शेकडो लोक त्यांना भेटायला येत असत. पुष्कळशा नाटकांचे वाचन, प्रकाशन आणि उद्घाटन त्यांच्या शुभहस्ते झालेले अनेकांना ठाऊक असेल. काव्यसंग्रह, भविष्यावरील पुस्तकांचे प्रकाशन त्यांच्याच आशीर्वादाने झालेले होते. या वस्तुस्थितीकडे कानाडोळा करून कसे चालेल ?

या एकंदर गोष्टींचा विचार करता मला स्पष्टपणे असे वाटते की पिंगे यांनी








आचार्य अत्रे यांचे व्यक्तीदर्शन केवळ आकसाने व सूडबुद्धीने केलेले आहे. आचार्य अत्रे यांचे नजिक पिंगे कधीच गलेले दिसत नाहीत. जवळ जाण्याची त्यांची हिंमतही नव्हती. त्यामुळेच आचार्य अत्रे हे त्यांना कळलेलेच नाहीत. प्र. स. पक्षावर वेळोवेळी केलेल्या कठोर टीकेमुळे, त्यांच्याविषयी एक प्रकारचा आकस धरून असत्य आधारांवर भोंगळ स्वरूपात पिंगे यांनी व्यक्तीदर्शन केलेले दिसते.

६५, हिंदु कॉलनी — प्र. र. इंगळे
दादर, मुंबई १४ ॲडव्होकेट

### अत्रे हयात असताना असे लिहिले असते ?

स. न. वि. वि.

आचार्य अत्रे यांच्या प्रयाणानंतर लिहिलेला ऑगस्ट 'दीपावली'तील श्री. रवींद्र पिंगे यांचा लेख वाचला.

'मरणान्तानि वैराणि' असे काही तरी वचन आहे म्हणतात. त्या सबंध लेखात लेखकानेच शेवटी म्हटल्याप्रमाणं महाकाय प्रतापी पुरुष अत्रे मला सापडले नाहीत. या लेखाचे लेखक कुठल्या पक्षाला शिरोधार्ह मानतात ते मला ठाऊक नाही, तरी पण लेख वाचल्यावर वाटते की लेखकाला प्रमाण असलेल्या प्र. स. पक्षाचे नाते आचार्य अत्रे यांनी तोडले. ते न साहून छिद्रान्वेषीपणानं पण शब्दांची भरळणीय पखरण करून तो लेख लिहून व अत्रे गेल्याचं निमित्त साधून वरीच तुंबलेली वखवख लेखकानं एकदा ओकून टाकली.

आचार्य अत्रे हा आगळा वेगळा पण एक प्रचंड डौलदार अनेक रसाळया आम्रफळांनी डवरलेला आम्रवृक्ष होता. हेही आता सर्वमान्य आहे. पण तरीही कुठल्याही आम्रवृक्षाला नसतात असे दुधार कंटक त्या आम्रवृक्षाला होते. त्या आम्रवृक्षाच्या अंगाखांद्यावर अगदी प्रेमाने वागडणाऱ्या निकटवर्तीयांनाही ते कमीअधिकपणाने बोचायचे, पण म्हणून कुणी आम्रफळे देणाऱ्या त्या 'आगळ्या' आम्रवृक्षाला तो केवळ निवडुंगच होता असं तो आम्रवृक्ष उन्मळून पडल्यानंतर त्याची राख झाल्यावर म्हणणं . . .

आचार्य अत्रे असताना असा लेख लेखकानं लिहिला असता तर आचार्य अत्रे उत्तर देऊ शकले असते की नाही हा प्रश्न वेगळा, पण माझ्या सारख्या वाचकाला लेखकाच्या बहाद्दर शूरपणाचं कौतुक करता आलं असतं; पण दलालसाहेब खरं सांगू का आपल्या मराठी साहित्यात प्रकृतीनं नि कृतीनं शूर असणारे साहित्यिक विरळाच. त्यात बिचाऱ्या पिंग्यांनाच दोष देऊन काय उपयोग. पण ही कल्पना आपल्या चित्र फलकासाठी छान आहे बघा. एक महाबलीसिंह मरून पडलेला आहे नि त्याच्यावर एक कावळा टोचा मारतोय्. घारी गिधाडं दाखवू नका त्यांना तीक्ष्ण अशी चोच नि नखं तरी असतात. एक शूरबहाद्दर कावळाच दाखवा झालं. अन् त्याला नाव मात्र द्या "शूर कावळा" बस्स.

जेकब सर्कल — अमर शेख
मुंबई–११

### अंध भक्ती टाळली हे अभिनंदनीय

स. न. वि. वि.

आपला ऑगस्टचा अंक वाचला. गांधीजी जन्मशताब्दी खास अंकात आचार्य अत्रे यांच्यावरील लेख छापून या अंकाला 'अत्रे विशेषांक' असेही स्वरूप आपण दिले आहे हे मला प्रसंगोचित वाटले. त्याबद्दल धन्यवाद !

आचार्य अत्रे ही एक वादग्रस्त व्यक्ती होती याचे प्रत्यंतर श्री. रवींद्र पिंगे यांच्या 'आचार्य अत्रे—एक दूरचा डोंगर' या लेखावरून येते. मी स्वतः आचार्य अत्रे यांच्या साहित्याचा भोक्ता आहे. त्यांच्यासारखे व्यक्तिमत्व क्वचितच कोणाला लाभते. त्यामुळे त्यांचे कित्येक समकालीन त्यांचा हेवा (क्वचित मत्सरही) करीत हेही मला माहीत आहे; पण तरीही अत्र्यांइतकी उंची कोणालाही गाठता आलेली नाही हे सत्यच आहे. मला अत्र्यांबद्दल भक्ती आणि आदर वाटतो, पण माझा आदरभाव आंधळा नसल्याने पिंगे यांच्या लेखातील मर्म मी ग्रहण करू शकलो. माणूस हा सर्वगुणसंपन्न असा कधीच नसतो. पिंगे यांनी अत्रे म्हणजे दुरून साजरा दिसणारा डोंगर कसे होते ते परखडपणे दाखविले आहे. या लेखामुळे पिंगे यांच्यावर अत्रे-भक्त खवळतील असे वाटते, पण नाण्याची दुसरी बाजूही स्पष्ट दाखविण्याची धडाडी त्यांनी निर्भयपणे अंगिकारली याबद्दल त्यांची पाठ थोपटली पाहिजे. अत्रे यांजमधील काही दोष त्यांनी दाखविले आहेत. त्यामुळे अत्र्यांना कमीपणा आला आहे असे मला मुळीच वाटत नाही.

दादर आपला
मुंबई २८ **प्रभाकर वैद्य**

### आकर्षकता कायम आहे

स. न. वि. वि.

ऑगस्टच्या 'दीपावली'चा अंक पहिल्यापासून अखेरपर्यंत संपूर्ण वाचला. पंचविशी गाठलेल्या 'दीपावली'च्या स्वरूपातील आकर्षकता कायम आहे. किंबहुना कलेकलेने वाढतेच आहे. श्री. साधले यांचा 'दीपावलीतील सांस्कृतिक साहित्य' हा लेख पूर्वी वाचलेल्या काही लेखांचे स्मरण देतो तर न वाचलेल्याबद्दल चुटपुट लावतो. लौकरच पंचविशी पूर्ण करणाऱ्या 'दीपावली'ला शुभेच्छा !

**वीर नरिमन रोड,** आपला
**मुंबई-१** **देवकिसन सारडा**
अध्यक्ष—महाराष्ट्र चेंबर ऑफ कॉमर्स















# ललित वाङ्मयाचे जादूगार

# प्रा. ना. सी. फडके

महाराष्ट्राचे सिद्धहस्त लेखक प्रा. ना. सी. फडके यांना दि. ४ ऑगस्ट १९६९ रोजी पंचाहत्तर वर्षे पुरी झाली. त्याप्रीत्यर्थ त्यांचे हे एक आगळे व्यक्तिचित्र....

प्रा. ना. सी. फडके यांनी पंचाहत्तरी पार केली ही गोष्ट काही खरी वाटत नाही. त्यांचे शरीर वयोमानानुसार थकलेले असणार. पण त्यांचे मन खरोखरीच अजूनही कसे चिरतरुण आहे त्याची साक्ष त्यांच्या अगदी अलीकडच्या कादंबऱ्यातही दिसते. एखाद्या तरुणाप्रमाणे अजूनही ते आठ तास काम करतात, लेखकाला तोंडी मजकूर सांगतात अन् वर्षातून दोनदा 'अंजली' मासिकाचे संपादन करतात. माझ्यासारख्या त्यांच्या तरुण मित्राला ते पत्र तर पाठवितातच पण वर आग्रहाने घरीही बोलावतात. गतवर्षी कै. आचार्य अत्र्यांच्या सत्तराव्या वाढदिवशी पुण्यास झालेल्या त्यांच्या भाषणाने श्रोते अगदी हरखून गेले. हां हां म्हणता त्यांनी कादंबरीसारखे चटकदार वाटणारे आपले आत्मचरित्रही पुरे करून टाकले. आणि म्हणून त्यांना शहात्तरावे वर्ष लागले ही गोष्ट गणितशास्त्राच्या समाधानासाठीच कबूल करायची. त्यांच्या आवडत्या क्रिकेटच्या भाषेत बोलायचे तर ते नाबाद पंचाहत्तर असून शहात्तरावी धाव त्यांनी नुकतीच काढली आहे.

दोन वर्षांपूर्वी महाराष्ट्र सरकारने फडक्यांना चारशे रुपयाचे मासिक मानधन देऊन 'नित्य वसते दारिद्र्य विद्वज्जनी' ही भर्तृहरीची काव्यपंक्ती अल्पांशाने का होईना खोटी करून दाखविली. केंद्र सरकारकडून 'पद्मभूषणा'ची किताबत त्यांना १९६२ सालीच मिळाली अन् नंतर महाराष्ट्र शासनानेही त्यांना मानधन देऊन त्यांचा गौरव केल्याने मराठी लेखकांना आता बरे दिवस येऊ लागणार अशी खात्री आम्हा तरुण लेखकांना वाटू लागली. खांडेकर, अत्रे, माडखोलकर अन् फडके हे चौघेही समकालीन साहित्यिक. पैकी अत्रे तर गेलेच. या चौघांनी जितकी विपुल

**अरविंद ताटके**

वाङ्मयनिर्मिती केली तशी आजच्या पिढीतले नव्या दमाचे लेखक करतील याची खात्री आज तरी देववत नाही. या सर्वात वयाने फडके अन् ग्रंथसंख्येने फडकेच ज्येष्ठ होत. वाङ्मयीनदृष्ट्या सरस कोण याची चर्चा सध्या तरी करण्याची आवश्यकता नाही. परंतु लघुकथाकार, कादंबरीकार, निबंधकार, नाट्यसमीक्षक, संगीताचे मर्मज्ञ, क्रीडा विषयावर गोडीने लिहिणारे लेखक, चरित्रकार, पट्टीचे वक्ते अन् प्रबंधकार वगैरे साहित्याच्या नवरत्नांनी फडक्यांच्या वाङ्मयाचा दरबार फुललेला आहे ही गोष्ट कुणालाही नाकारता येणार नाही. 'फडके संपले' म्हणून टीकाकार कितीही टाहो फोडोत. पण ते सतत पन्नास वर्षे वाङ्मयाची उपासना अखंडपणे करीत आहेत अन

त्यांच्या लेखनाची गोडी अवीट आहे ही वस्तुस्थिती त्यांच्या टीकाकारांनाही आडवळणाने का होईना कबूल करावीच लागेल.

### सतत पन्नास वर्षे लेखन

फडक्यांची 'मेणाचा ठसा' ही पहिली लघुकथा (रहस्यकथा म्हणू हवे तर) १९१२ साली प्रसिद्ध झाली तर त्यांची 'अल्ला हो अकबर' ही कादंबरी १९१७ साली प्रकाशित झाली. म्हणजे या वर्षी त्यांच्या कादंबरी लेखनाला बावन्न वर्षे पुरी झाली असे म्हणण्यास हरकत नाही. सतत अर्धशतकभर कादंबऱ्या लिहिणारा त्यांच्यासारखा दुसरा लेखक मराठीत तरी आज नाही. पन्नास वर्षे ते डौलदार भाषेत लिहिताहेत ही गोष्टही प्रांजलपणे कबूल केली पाहिजे. नाट्याचार्य खाडिलकरांचा अन् त्यांचा घरोबा असल्याने त्यांनी आपली ही पहिली कादंबरी त्यांना आधी वाचावयास दिली होती. त्या कादंबरीचा त्यावेळी त्यांना मोबदला मिळाला अवघा पन्नास रुपये. त्यानंतर त्यांची गाजलेली 'कुलाब्याची दांडी' कादंबरी १९२२ साली प्रसिद्ध झाली. अल्ला हो अकबर पासून ते कुहू! कुहू! पर्यंत त्यांनी पन्नास कादंबऱ्या लिहिण्याचा पराक्रम केला अन् आता तर त्यांच्या कादंबऱ्यांची संख्या साठाच्या वर गेलेली आहे. आता एक गोष्ट खरी की फडक्यांच्या कुलाब्याची दांडी, जादूगार, दौलत, अटकेपार, कलंकशोभा, उद्धार, काश्मिरी गुलाब वगैरे कादंबऱ्या कलेच्या दृष्टीने जेवढ्या सरस ठरल्या तितक्या त्यांच्या अलीकडच्या कादंबऱ्या डोळ्यात भरण्यासारख्या नाहीत हा त्यांच्या कादंबऱ्या वाचणाऱ्या डोळस अन् चिकित्सक वाचकाचा दावा खोटा कसा मानावा? पण पट्टीच्या फलंदाजाचे सगळेच डाव थोडेच रंगतात? त्यांच्या काही इनिंग्जच अविस्मरणीय असतात तोच निकष फडक्यांच्या कादंबऱ्यांना लावावयास हवा.

### एकशेसाठांवर ग्रंथ-संख्या

अलीकडच्या काळात फडक्यांच्या इतका विपुल अन् विविधतेच्या वैचित्र्याने नटलेले वाङ्मय लिहिणारा वाङ्मय भक्त विरळाच म्हणावा लागेल. साठाच्यावर कादंबऱ्या, एकवीस प्रबंध, आठ नाटके, पंचवीस लघुकथा संग्रह, अकरा ललित निबंध, सात चरित्रे, पाच व्याख्यान संग्रह, एक काव्यसंग्रह अन् सुमारे डझनभर इंग्रजी ग्रंथ अशी त्यांची प्रचंड ग्रंथसंख्या असून आकड्यातच बोलायचे तर १६० च्या वर त्यांच्या ग्रंथसंखेचा पल्ला गेलेला आहे. त्यांच्या वाङ्मयावर आतापर्यंत अनेक टीकाकारांनी-लेखकांनी बरे वाईट अभिप्राय लिहिले आहेत. फडक्यांनी त्याची फिकीर कधी केली नाही. टीकाकारांपेक्षा ते आपल्या वाचकांनाच जास्त मानतात. वाचकांची नाडी त्यांनी पुरी ओळखलेली आहे. अन् म्हणून टीकाकारांच्या टीकेची क्षिती त्यांनी कधी बाळगली नाही. कारण आपल्याला वाचकांचा तुटवडा कधी पडणार नाही याची त्यांना पक्की जाण आहे. त्यांच्या साऱ्या वाङ्मयात त्यांना अग्रपूजेचा मान द्यायचा तर तो कादंबरीकार म्हणूनच द्यावा लागेल. त्याविषयी त्यांचे समकालीन अन् प्रख्यात कादंबरीकार ग. त्र्यं. माडखोलकर यांचा अभिप्राय पुढीलप्रमाणे आहे: "कै. हरि नारायण आपटे यांच्यानंतर प्रा. फडके यांच्याइतका ललित साहित्याच्या सर्व शाखा समृद्ध करणारा दुसरा ललित-लेखक महाराष्ट्रात झालेला नाही, असे म्हणावयाला मला यत्किंचितही शंका वाटत नाही त्यांच्या नंतरच्या (हरिभाऊंच्या) पिढीत जे अनेक ललित लेखक आणि मुख्यतः कादंबरीकार उदयाला आले, त्या सर्वात विविधतेच्या, शैलीच्या, सौष्ठवाच्या आणि रंजनक्षमतेच्या दृष्टीने प्रा. फडके यांची बरोबरी एकही लेखक करू शकेल, असे वाटत नाही. केवळ विपुलतेच्या आणि चटकदारपणाच्या दृष्टीने नाथमाधव किंवा हडप, केवळ कल्पकतेच्या आणि सात्विकतेच्या दृष्टीने खांडेकर, चिंतनशीलतेच्या आणि चर्चेच्या दृष्टीने प्रा. वा. म. जोशी, निरीक्षणाच्या आणि भेदकतेच्या दृष्टीने मामासाहेब वरेरकर, समाजविश्लेषणाच्या आणि विक्षिप्तपणाच्या दृष्टीने डॉ. केतकर, कल्पनाविलासाच्या आणि ध्येयवादित्वाच्या दृष्टीने पु. य. देशपांडे इत्यादि गेल्या दोन पिढ्यांतील कादंबरीकार हे आपापल्या परीने मोठेच म्हणावे लागतील; — पण ललित लेखनाचे विविधत्व, रुचिरत्व आणि सातत्य हे तर तीन गुण घेतले व त्याबरोबरच कादंबरी लेखनातील वैचित्र्य आणि विशालता हे आणखी दोन गुण जमेस धरले तर कै. आपटे यांची अनेक बाबतीत बरोबरी करणारा आणि काही बाबतीत त्यांच्यापेक्षा वरचढ ठरणारा ललितलेखक आणि कादंबरीकार म्हणून प्रा. फडके यांनाच अग्रपूजेचा मान द्यावा लागेल" (प्रा. फडके गुणगौरव ग्रंथ, १९६०, पृ. १८६–१८७) हा अभिप्राय सहृदयी समकालीन लेखकाचा








होय. आचार्य अत्रे यांच गुणग्रहण फडक्यांच्या टीकाकारात कै. आचार्य अत्रे यांचे स्थान एकमेवाद्वितीयच म्हणावे लागेल. पण त्यांनीही म्हटले आहे—"प्रो. फडके हे मराठीतील एक सव्यसाची व्यासंगी आणि अव्वल प्रतीचे प्रतिभाशाली लेखक आहेत हे मेंदू ठिकाणावर असलेल्या कोणालाही कबूल करावेच लागेल'.... मराठी कादंबरीकारांमध्ये प्रा. फडक्यांचे स्थान 'एकमेवाद्वितीय' अशा पराकोटीचे नसले तरी मराठी कादंबरीकारांची गणना करताना कोणालाही एका हाताची बोटे संपण्यापूर्वीच फडक्यांच्या नावाने बोट आधी मोजावे लागेल यात तिळमात्रही शंका नाही" (मा. का. देशपांडेकृत 'कादंबरीकार फडके' ग्रंथाला लिहिलेली प्रस्तावना, सन १९६५).

कादंबरी अन् लघु कथांखेरीज इतर विषयांवरही फडके अतिशय चवीने अन् लालीत्यपूर्ण लेखन करतात. दादाभाई नौरोजी, टेरेन्स मॅकस्विनी, डी. व्हॅलेरा, लो. टिळक, महात्मा गांधी अन् बाबुराव पेंटर या त्यांनी लिहिलेल्या चरित्रात त्यांचा व्यासंग दिसून येतो. लो. टिळकांनी त्यांना आपले चरित्र लिहिण्यास कसे प्रोत्साहन दिले आणि त्या आधी चिरोलचे 'इंडियन अनरेस्ट' पुस्तक त्यांना मुद्दाम कसे वाचण्यास सांगितले त्याच्या रम्य आठवणी त्यांनी आपल्या 'साहित्य सेवेतील स्मृती'त सांगितल्या आहेत. त्यांच्या 'दादाभाई नौरोजी' चरित्राला तर मुंबई विश्वविद्यालयाचे २०० रुपयांचे पारितोषिक मिळाले (१९१९) होते. त्यांनी लिहिलेले अप्पासाहेब किर्लोस्करांचे चरित्रही चटकदार असून त्यात त्यांचा नाट्यविषयातला व्यासंग स्पष्ट दिसतो. 'नादलुब्धांच्या आठवणी' ग्रंथात हिराबाई, रहिमतखाँ, अल्लादियाखाँ, मंजीखाँ, सतारवादक विलायत हुसेन, तबलापटु अल्लारखाँ अन् बडे गुलामअल्ली वगैरेंच्या आठवणी इतक्या खुमासदारपणे त्यांनी सांगितल्या आहेत की संगीतकलेचा जणु एक कालखंडच आपल्याला खुर्चीवर बसल्या बसल्या पहावयास मिळतो. नृत्याचेही वावडे त्यांना नाही. आपल्या 'साहित्य सेवेच्या स्मृती'त अजूरी या नर्तकीचे काही किस्से त्यांनी खुलवून खुलवून सांगितले आहेत. क्रिकेट हा त्यांचा खास आवडीचा विषय. क्रिकेटपटू दुलीपसिंहजींचे वर्णन ते कसे करतात ते पहा—"धावा काढावयाच्या वेळी ते सशाच्या वेगाने धावत असत; पण ज्या वेळी टोला लांब गेला असेल त्यावेळी दिवाणखान्यात चालावे अशा सावकाशीने आणि रमतगमत चालत ते एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत जात.' हॉकीपटू ध्यानचंदला जगाने डोक्यावर घेतले तेव्हा ते सहज लिहून जातील "कालिदासाचे शाकुंतल जर्मन कवि गटे हा डोक्यावर घेऊन नाचल्याचे ऐकून आपणास जो आनंद होतो तोच ध्यानचंदला तिकडले खेळाडू डोक्यावर घेऊन नाचले हे ऐकून आपल्याला झाला पाहिजे." गामाने १९२८ साली पतियाळा येथे एका सपाटच्यात कुस्तीत झिस्कोला भुईसपाट केल्यावर ते लिहितील: "झिस्को हा एक भ्रमाचा भोपळा होता हे जितके खरे तितकेच त्याच्यावर चुटकीसारखा विजय मिळविण्यात गामाने मिस् मेयोच्या गलिच्छ पुस्तकाला उत्कृष्ट जबाब दिला हेही खास !" त्यांचे 'गुजगोष्टी'तील लघुनिबंध हे मराठी वाङ्मयाचे एक शोभिवंत लेणे आहे. एकूण काय तर विविध विषयात त्यांच्या लेखणीचा संचार गेली पन्नास वर्षे अनिरुद्धपणे चालू आहे.

## अतिशय रंगदार वक्तृत्व

फडके हे पट्टीचे वक्तेही आहेत. लाखांच्या सभेत गर्जना करण्याचे राजकीय पुढाऱ्यांचे वक्तृत्व त्यांच्यापाशी नाही पण सुशिक्षित अन् विद्वज्जनात साहित्याच्या विषयावर त्यांची भाषणे अतिशय रंगतात. मग विषय खाडिलकरांचा असो, किर्लोस्कर-गडकऱ्यांचा असो अगर गोविंदराव टेंब्यांचा असो. त्यांच्या राजाराम कॉलेजचे प्राचार्य डॉ. बाळकृष्ण हेही पट्टीचे वक्ते. ते फडक्यांना नेहमी म्हणत—'आय विश् आय् हॅड युवर आर्टीस्टरी ॲण्ड युवर स्वीटनेस'. बाळकृष्णांचे हे वर्णन यथातथ्य आहे यात काय संशय ? १९५१ साली फडके कोल्हापूर सोडून पुण्यास स्थायिक होण्यास आले तेव्हा झालेल्या निरोपाच्या वेळी ते म्हणाले, "कोल्हापुरात पंचवीस वर्षांपूर्वी आलो तेव्हा पहिला घास गोविंदरावांच्या घरी खाल्ला. आज त्यांचाच आशीर्वाद घेऊन मी परत जात आहे." या एकाच वाक्याने त्यांनी सभा जिंकली. जुन्या वक्त्यांच्या आठवणी त्यांनीच सांगाव्या. जयकर, सरोजिनी नायडू, दादासाहेब खापर्डे, सर सी. पी. रामस्वामी, लाला-लजपतराय, टिळक, अच्युतराव कोल्हटकर, तात्यासाहेब केळकर, शिवरामपंत परांजपे, राधाकृष्णन्, श्रीनिवास शास्त्री, पंडित नेहरू अन् स्वा. सावरकर इत्यादि गाजलेल्या वक्त्यांच्या आठवणी यांनी ग्रथित केल्या आहेत. त्या वाचल्यावर फडक्यांची वक्तृत्वाची हौस किती खोलवर गेलेली आहे त्याची छान कल्पना येते. साहित्यिक भाषेत मोठ्या व्यक्तींना खडसावण्यास त्यांची लेखणी कधी कधी आगळेच रूप धारण करी. १९३२ साली कोल्हापुरास भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद दिले गेले सयाजीराव गायकवाडांना. राजे लोकांना साहित्याच्या दरबारात मान कशाला असा होता फडक्यांचा सवाल. तेव्हा ते लिहून ले—"संस्थानिक आपल्या सिंहासनावर सरस्वतीच्या उपासकाला कधी बसवीत नाहीत मग साहित्यिकांनी आपल्या सिंहासनावर संस्थानिकांना कां बसवावे ?" हा टोला किती मार्मिक आहे त्याची कल्पना वाचकांना सहज यावी.

## टीकेबाबत खंबीर वृत्ती

राजाराम कॉलेजातून निवृत्त झाल्यानंतर १९५१ साली फडके पुण्यास स्थायिक झाले. स्वतःच्या घराला त्यांनी 'दौलत' असे नाव दिले असून तिथे लेखनाच्या आखाड्यात ते सदैव दंग असतात. लेखन सर्व तोंडी मजकूर सांगून करतात. सकाळी साडे आठ ते साडे अकरा अन् दुपारी ३॥ ते ८॥ असा त्यांचा लेखनोद्योग चालू असतो. त्यांची बैठक अशी दांडगी असल्यानेच ते एवढे प्रचंड लेखन करू शकले. गप्पांच्या फडात वेळ जाऊ न देण्याची दक्षता ते नेहमीच बाळगतात. एकदा मजकूर सांगतील तो कायम. मजकूर सांगण्यात खंड पडला तरी त्यांच्या विचाराचे अनुसंधान म्हणून कधी सुटायचे नाही. एवढे प्रचंड लेखन करीत असताना त्यांच्यावर टीकाही

अनुक्रमणिका








# शाहीर हरपला

शाहीर अण्णाभाऊ साठे गेले. अचानक गेले. अकाली गेले. त्यांच्या आजाराचा आणि त्यांच्या एकाकीपणाचा पत्ता फारसा लागला नाही. एक दिवस वार्ता आली "अण्णाभाऊ साठे गेले". ती वार्ता वाचल्यानंतर माझी पहिली प्रतिक्रिया झाली ती 'शाहीर हरपला' ह्या शब्दात व्यक्त केली आहे. अण्णाभाऊ साठे केवळ शाहीर नव्हते तर ते उत्तम कथाकार–कादंबरीकार होते. त्यांच्या वैजयंता, आवडी, फकिरासारख्या गाजलेल्या व मराठी कादंबरीच्या क्षेत्रात आपले आगळे वैशिष्टच नोंदवून गेलेल्या कादंबऱ्यांवर चित्रपट निघाले, तेही गाजले हे सारे मला संपूर्णतया ठाऊक असूनही 'शाहीर हरपला' हीच माझी प्रतिक्रिया झाली. माणसे व्यवहारात 'व्यवहार' म्हणून अनेक गोष्टी करतात. तडजोड म्हणून त्यांना त्या कराव्याही लागतात, तरीही त्याचा म्हणून एक 'पिंड' असतो. खास 'क्षेत्र' असते. व्यवहार साधून व साधता साधताही त्याचा तो पिंड अधून-मधून उफाळून वर येतोच. अण्णाभाऊ साठे अनेक पैलूंनी मंडित असूनही हाडाचे, पिंडाचे शाहीर होते. अतिशय संवेदनाशील मन, आणि काव्यात्म प्रतिभा असलेला हा शाहीर होता. त्यांचे ते मन आणि ती प्रतिभा एका पक्षीय कार्यार्थ राबली असली व त्यामुळे जन-साधारणाचे खूपसे कौतुक तिला लाभले नसले तरीही त्यामुळे त्या कलावंताचे अंगभूत मोठेपण काही कमी होत नाही.अण्णाभाऊंनी नंतरच्या काळात कथा-कादंबऱ्यांवर (मागणी-नुसार व गरजेनुसार) भर दिला असला तरी त्यांचे तळमळते व तडफडते मन मात्र जागल्या शाहीराचेच होते. त्यांनी लिहिलेले सवाल जबाब, लोकनाट्य, कवने ह्या गोष्टी समर्थ-प्रतिभ होत्या. आणि 'काकाजी'च्या भाषेत सांगायचे झाले तर 'वेदना नेहमी सुरेख बोलते' तशी अण्णाभाऊंची वेदना 'सुरेख' बोलत होती. सातारहून पायी चालत मुंबईत आलेले आणि शिक्षणाची गंधही नसलेले मातंग समाजात जन्म घेतलेले हे पोर "मदायत्तं तु पौरुषम्" ह्या न्यायानं 'साहित्यिक पुरुषार्थ' गाजवून गेले. कारण एकच– वाटचाला आलेले जिणे व त्यातून मनाला झालेले डंख ! मन हळवे बनले की क्रियाशून्य तरी बनते किंवा 'पुरुषार्थी' तरी बनते. अण्णाभाऊंनी जन्म, रूप, रंग, जात, शिक्षण, राजकीय पक्षांची कुंपणी ओलांडून साहित्यप्रांती नाव केले. मला हा त्यांचा पराक्रम फार मोठा वाटतो. सुसज्ज मेज, पंखा, दिवा, उत्तम खाणेपिणे, मानसिक स्वास्थ्य व थोरा-मोठ्यांची वेळी (अवेळी) मिळणारी शाबासकी यापैकी कसलीही शिदोरी पाठीशी नसताना अण्णाभाऊंनी हे सारे लेखनक-र्तृत्व गाजविले हे त्यांचे अंगभूत मोठेपण ! गरजेपोटी जे लिहिले जाते ते नेहमी सरस व सकस असतेच असे नाही. अण्णाभाऊ जे जीवन जगत होते त्या पोटी असे काही त्यानी लिहिलेही असेल. पण ती आपल्या पुष्कळशा साहित्यिकांचीच शोकांतिका आहे, असे म्हणावे लागेल. लेखनातल्याप्रमाणेच त्यांचा जीवनातही तोल ढळला होता. अखेरीस त्याने त्यांचे वर्धिष्णु जीवन खाऊन टाकले. एक 'शाहीर' मूक झाला. एक प्रतिभासंपन्न, बहरते व्यक्तित्व करपून गेले. काळाने आपले काम केले आणि तरीही काळाला मराठी साहित्यातले एक नाव कधीही पुसून टाकता येणार नाही—अण्णाभाऊ साठे ! ! प्रतिकूलतेवर सतत स्वार होऊन उरलेल्या अण्णा-भाऊंच्या स्मृतीला अभिवादन ! !

–आदित्य

काही कमी नाही झाल्या ? १९३२ साली त्यांनी लिहिलेल्या 'प्रतिभासाधन' ग्रंथावर टीकाकारांनी जोरदार हल्ला केला. पहिला टीकालेख चित्रमयजगतचे संपादक रा. प्र. कानिटकर यांनी 'ज्ञानप्रकाश'मध्ये लिहून केला. तेव्हा हा वाद वरीच वर्षे चालू होता. फडक्यांनी साहित्यसेवेतील स्मृती लिहि-ण्यास सुरुवात ('झंकार'मधून) केली तेव्हा शं. कृ. देवभक्तांनी 'विविध वृत्तात' लेख लिहून या वादाला पुन्हा तोंड फोडले. देवभक्त यांची ही टीका 'प्रतिभालांछन' (१९४४) या नावाने ग्रंथरूप झाली आहे. अत्रे-फडके वाद तर अनेक वर्षे चालू होता. १९४२ साली फडक्यांनी द्वितीय विवाह केला तेव्हाही टीकेचा धुराळा त्यांना सहन करावा लागला. या सगळ्या गोष्टी आता इतिहासजमा झाल्या आहेत. पण शिल्लक राहिली आहे ती म्हणजे फडके यांची प्रचंड ग्रंथसंपदा अन् त्यांचे वाङ्मय !

फडक्यांच्या पत्नी सौ. कमलाबाई याही लेखिका आहेत ही गोष्ट सर्वांच्या सुपरि-चयाचीच आहे. त्यांच्या दोन्ही मुली रोहिणी अन् अंजली सुस्थळी पडल्या असून त्यांचा कॉलेजात शिकत असलेला मुलगा विजय हाही क्रिकेट शौकिन आहे. मुले त्यांना अप्पा म्हणतात.

पत्रांना उत्तरे देण्यास फडके कधीही खळखळ करणार नाहीत. मी त्यांच्या 'अशा झुंजा ! असे झुंजार !' या क्रिकेट-विषयक पुस्तकाचे परीक्षण 'दीपावली'त केल्यावर त्यांचे पुढीलप्रमाणे लगोलग पत्र आले —

'तुमचे परीक्षण वाचले. आवडले. केवळ पुस्तकाची प्रशंसा तुम्ही केलीत म्हणून नव्हे तर तुमच्या लिहिण्यात मार्मिकता आणि रसग्राही दृष्टी दिसली म्हणून. तुमचे क्रिकेट-विषयक लिखाण मी नेहमी आवडीने वाच-लेले आहे. तुमच्यासारख्या क्रिकेटप्रेमी दर्दी लेखकाने माझ्या पुस्तकाची प्रशंसा केलेली बघून मला साहजिक विशेष आनंद झाला.

फडक्यांच्या 'दौलत' या निवासस्थानात मी त्यांना जेव्हा भेटण्यास गेलो तेव्हा ते माझ्यासाठी तयारच होते. एखाद्या ऑफि-सात बसावे त्याप्रमाणे ते बसले होते. ते म्हणाले,

(पृष्ठ ५८ वर पहा)



अनुक्रमणिका

# "नाश्त्याबरोबर मी नेहमी तांबं खातो !"



शिवाय लोह, कॅल्शियम अन् आयोडिन खातो ते वेगळंच. खरं तर हे सदगृहस्थ ८ महत्त्वाची खनिज द्रव्ये अन् ११ अत्यावश्यक जीवनसत्त्वे घेत असतात. निरोगी जीवनाला अपरिहार्य असलेली ही सारी द्रव्ये व्हिमग्रॅनच्या अवघ्या एका टॅबलेटमध्ये सामावलेली असतात. नुसतेच आरोग्य नाही तर उत्साह अन् प्रखर रोगप्रतिबंधक शक्ति यांसाठी आवश्यक असणारी सारी जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये व्हिमग्रॅनमध्ये आहेत. उदाहरणच द्यावयाचे झाले तर तांबं घ्या. ताज्या रक्ताची निर्मिती अन् कामासाठी लागणारा उत्साह आपल्याला या खनिजामुळे मिळतो. व्हिमग्रॅनमधील इतर जीवनसत्त्वे व खनिज द्रव्ये नियमित घेतल्याने या सदगृहस्थांची त्वचा अन् दृष्टी अतिशय निरोगी राहिली असून त्यांचे दात अन् हाडेही पूर्वी कधी नव्हती पक्की कणखर आहेत.

## व्हिमग्रॅन®

अनेकविध जीवनसत्वे व खनिजे असलेल्या टॅबलेटस्






® हा रजिस्टर्ड ट्रेडमार्क ई. आर. स्क्विब अँड सन्स यांचा असून तो वापरण्याची अनुमती करमचंद प्रेमचंद प्रा. लि. यांनी मिळविली आहे.

**व्हिमग्रॅनची अवधी एक टॅबलेट दिवसासाठी लागणारा सारा उत्साह मिळवून देते.**

SQUIBB®
SARABHAI CHEMICALS

अनुक्रमणिका



# अ भि ने त्री



आणि एका कळीचं त्या दिवशी अगदी अजाणतेपणी फूल झालं. ती त्या वैभवानं मोहरली. अंगोपांगात चैतन्य नाचायला लागलं. नव्या नवतीचा वारा गात्रागात्राला उल्हसित करायला लागला. तारुण्याला मदनस्पर्श झाला की असंच काहीसं विलक्षण घडतं. निरागसता रागेजली होते. लालवट ओठाला विनाकारण दात चावायला लागतात. तिला अजून पूर्ण फुलायला अवकाश होता; पण कळीपणातून ती हरवली. शैशवाचा किनारा पुसट झाला. आता ताटव्याचं कुंपण नकोसं झालं होतं. आता समर्पणाला मनाची तयारी झाली होती. अगदी अभावितपणं. कुण्या मांत्रिकानं हे झाड भारावून टाकलं होतं, कुणास ठाऊक पण होतं मात्र सदैव स्वप्नात असल्यासारखं. जागं तरीही झोपलेलं. सुखानं द्रवलेलं.

ती आज फुलली होती. चांदण्यासारखी. प्रेक्षागारातला सोहळा. डोळे सुखावले होते. कमालीची तृप्ती शरीराला वेढीत होती. तिचा हात सहजच डोळ्यांवरून फिरला. कृतज्ञतेच्या आसवानी ओलावला. त्या कृतार्थ नीलकमलासारख्या डोळ्यात मघाचा प्रसंग, अगदी ओला प्रसंग रेंगाळला होता.

ते पारितोषिक. ज्यांच्या हस्ते पारितोषिकं देण्यात येत होती ते भारतातले विख्यात साहित्यिक; त्यांच्या हाताचा स्पर्श याच वोटांशी जरा अधिक लगट करून गेला. त्यांचे वयानं भिजलेले डोळे तिच्या डोळ्याशी वोलायचा केविलवाणा यत्न करू लागले. जिथं असायचा आशीर्वाद, तिथं होतं काय? विचाराला तिला वेळच नव्हता. "वा ! वा ! नानांची शिष्या. हिच्या पुढं अभिनय हात जोडून उभा. अहो चौसष्ट-कला केर काढतील हिच्या घरी." कुणी पगडीवहाद्दर म्हणत होता. हिच्या काळजात एक नटवी नटमोगरी हसली. 'ही ती राधा'! 'हाय अल्ला! क्या वात है'। कुणाची तरी उर्दू प्रिया वोलत होती. कौतुकानं ती डवरली होती. होय ती राधा होती. मेनका होती. करुणा होती. निर्मला होती. शकुंतला होती. सारी












अनुक्रमणिका

तिचीच रुपं. परकाया प्रवेश तिला बेमालूम साधत होता. प्रेक्षक बेहद्द खूष होते. तिला भरूनच आलं. मान कलली. दोन डोळे अश्रूंनी डवडबलेले तिनं पाहिले. 'नाना! नाना!' ओठ पुटपुटले. नाना चष्म्याआडून पाहात होते. तिच्या शरीराला वेग आला. ती झपाट्यानं नानांकडे निघाली. केवढा महान माणूस! केवढी कलात्मक उंची गाठलेला. केवढा रसिक.

एकाद्यानं किती माया करायची? नाना, नाना, तुमचं ऋण कसं फेडायचं? प्रेमाचं ऋण फेडणं ही कल्पना तरी सहृदयाला खपेल का? केवळ कल्पनेनंच हृदय फाटून जाईल. नाना तुमच्या सारखे तुम्हीच. सागराला अथांगता दुसरं कोण देणार? चांदण्याला शीतलता आणणारं काय असणार? नाना! मी कृतज्ञ आहे. तिच्या डोळ्यापुढं नानांची पर्वतप्राय मूर्ती उभी होती. नखशिखान्त तेजानं तेजाळली होती. उदात्ततेचा हुंकार भरीत होती. हा माणूस खरंच साक्षात्कारी. त्यानंच तिला अभिनयाचा साक्षात्कार घडवला. एक महान् शिल्पकार. आज शिल्पाची पूजा होत होती. आणि त्याच क्षणी शिल्प शिल्पकारासमोर नतमस्तक झालं होतं.

तिच्या डोळ्यापुढं आलं नायगावातलं तिचं जुनाट घर. वावा गेल्यानं अधिकच मळकट भासणारं. उदास, भकास, कधीही न हसणारं. आणि एक दिवस त्या घरात आपला चेहरा विसळला. ते थोडकंच हसलं. त्या दिवशी तिथं नाना आले होते. केव्हढी प्रख्यात असामी. प्रसिद्धी ज्यांची वटीक, स्तुतीला नाकारलं लटकं, तरीही ज्यांची पाठ सोडायला ती कबूल नव्हती. असे नाना तिथं आले. मोठमोठ्यांनी आमंत्रणं करून निराश व्हावं असं ज्यांचं येणं. ते आज आपण होऊन आले. तिचे डोळे असेच भरून आले होते त्या दिवशी. नानानी काळा चष्मा काढला. वटवटीत तांबरलेल्या डोळ्यातलं पाणी पुसत ते म्हणाले, "पोर फार फार गुणाची आहे. कालिदासाची शकुंतला नायगावात जन्माला यावी. रंगभूमीचं भाग्य."

**....गुरुदक्षिणा! गुरुदक्षिणा!!....तिचं काळीज बोलत होतं....दान असं असतं! तिथं देणारा सुखी नि घेणारा कृतार्थ असतो. इथं सारीच अतृप्ती, बेचैनी....**

तिला धन्य वाटलं. ती त्या मोठ्या माणसाकडे पहात राहिली. सारं देहभान विसरून. नाना हसले. 'येतो' म्हणाले. ते शब्द तिला कसेसेच वाटले. ती हसली. ते दृष्टीआड होईपर्यन्त पहात राहिली. मग नाना रोज येतच राहिले. शेजारी कौतुक करायला लागले. "असामान्य कलावंताची पायधूळ रोज या भिकारड्या चाळीला लागते." त्यांना धन्य धन्य वाटत होतं.

मूर्ती आकारू लागली. रोज नवे नवे संस्कार घडत होते. नाना आपलं हृदयच जणु ओतीत होते तिच्या अभिनयात. कधी कधी हृदयाशी धरून म्हणायचे 'पोरी नाव काढशील, माझं नाव काढशील' त्यांचे दमदार शब्द हृदयाला गोंजारायचे. आणि पुन्हा जोरदार तालमी सुरू व्हायच्या. प्रसिद्धीची तेजाळती रेषा तिला रोज

## अशोक परांजपे

स्वप्नात दिसायची. हजारो प्रेक्षकांची दिलखुलास दाद. तो एकमेव अनुभव कितीदा तिनं जागेपणीच्याच स्वप्नात घेतला होता. आणि एक दिवस ही कालिदासाची शकुंतला रंगमंचावर आली.

जाहीरातीतील तिच्या रूप-गुणांची स्तोत्रे चाळकरी नवलाईनं म्हणायला लागले. आणि अशातच 'शकुंतला'चा पंचविसावा प्रयोग झळकला. आज नाना कण्वाच्या भूमिकेत मंचावर येणार होते. ती आनंदली. नानाबरोबर काम. स्वर्गच दुसरा. तिचं अंग अंग अनोख्या लयीत नाचत होतं. नाटक वेगावलं. पाठवणीचा प्रसंग आला. नानांच्या भाषणानं श्रोते मंत्रमुग्ध झाले. प्रत्येक पिता अश्रूंनी डवडबलेल्या नेत्रांनी नानांवर कौतुकाची पखरण करीत होता. तिला भावनांचा आवेग आवरला नाही. नानांच्या जागी तिला तिचे बाबा दिसायला लागले.

खरंच तसेच डोळे, तसेच नाक, तेच ओठ. 'बाबा!' ती आवेगानं नानांच्या कुशीत शिरली. प्रेक्षागारात टाळ्यांचा पाऊस पडत होता. रसिकांकडून मिळालेली ही यशाची पावती. मग रोज अत्तर-गुलाब बरसू लागले. तिच्याभवती यशाचं मखर सजलं. प्रसिद्धीची रोषणाई मखर उजळवीत होती. मखरातली तिची मूर्ती स्तुतीच्या मणिहारांनी शोभली होती. "हे कुणाचं धन? कुणाची ही किमया?" नानांची, नानांचीच.

"नानांनी मला आकार दिला. दगडाची मूर्ती बनवली. नानांनी काय दिलं नाही? सारं सारं दिलं. या उलट मी काय दिलं? मूर्ती शिल्पकाराला काय देते? एक अवर्णनीय समाधान! निर्मितीतलं समाधान! पण मी सजीव आहे. काय करू?" तिचं मन वेडावून जाई. रोज रात्री असंच व्हायचं. गुरुपूजा तिच्या समोर दिसायची. कुणी करायची? तिला कळतच नव्हतं. आणि आज हा बहुमान लाभला होता. महाराष्ट्र राज्याचा प्रथम पुरस्कार तिला मिळाला होता. 'नाना कुठायत?' ती सभापासून इतकी गर्दीत होती की तिला कसलंच भान नव्हतं. तिचं डोकं गरगरायला लागलं. ती झपाझप पावले टाकीत रंगमंदिराचं आवार ओलांडून रस्त्यावर आली. तशी एक टॅक्सी तिच्यापुढं आली. आतून शब्द आले. 'येना बाळा आत' तिनं पाहिलं. नाना होते. बेचैन, अस्वस्थ. तिनं दार लावून घेतलं. नाना जवळ आले. नानांचा हात पाठीवरून फिरत होता. तिनं त्यांच्या खांद्यावर मान टाकली. नानांचा हात हळूच तिच्या गालावर येत होता. ते ओले होते. नाना हसायचे. ती पण हसत होती. 'नाऽऽना' तिचे ओठ बोलले. 'काऽय' म्हणत नानानी तिला अधिक जवळ घेतलं. नाना कण्वाच्या भूमिकेत असंच तिला कवटाळायचे. तिला खूप रडावसं वाटलं. नाना केसातून हात फिरवायला लागले तशी तिला रडू कोसळलं.



अनुक्रमणिका

नानांचा श्वासोच्छ्वास जोरदार चालला होता. शब्दाशिवाय नाना बोलत होते. आपल्या डोळ्यांनी. पण तिला ते कळत नव्हतं. रंगभूमीवर नाना असेच बोलायचे आपल्या डोळ्यांनी. हवा तो रस. हवी ती भावना! नाना खेचून आणायचे. नटश्रेष्ठ नाना अभिनयाच्या जलधारात अवघा प्रेक्षकगण भिजवून टाकायचे. पण तिला आज तसला प्रत्यय येत नव्हता. नाना कशासाठी तरी तळमळत होते. ते मुळीच शांत नव्हते.

तिच्या यशानं त्यांची छाती भरून आली होती, पण हृदय दुखावलं होतं. निदान असावं. तिला तरी असंच वाटलं. पण बोलायचा धीर होईना.

'बाळा दमलीस ना! प्रसिद्धी अशीच असते.' नाना ओलंओलसं बोलले. तिनं वर पाहिलं, नाना अनिमिष नेत्रांनी पहात होते. तिचा पदर पडला होता. ती त्यांना अधिकच विलगली. तिला या क्षणाशिवाय आता काही म्हणजे काही नको होतं. नानांचा 'नाटचकुंज' आला. टॅक्सी थांबली. विलक्षण सुस्तीतच ती आपल्या भाग्यविधात्याच्या मागोमाग दिवाणखान्यात आली. रात्र चढली होती. मदिर हवा झिंगली होती. ती जागा शांत शांत होती. 'आई कुठायत' तिनं विचारलं. नाना कोट काढता काढता बोलले. 'माहेरी गेलीय चार दिवसांसाठीऽऽ' नानांचा स्वर कातरला. तिला भीतीच वाटली.



'मी घरी जाते!!'

अपरात्री बाळा कुठं ग जाशील? नानांनी तिच्या खांद्यावर हात ठेवला. नाना शुद्ध हरवल्यासारखे करीत होते. आवंढा गिळीत ते बोलायला लागले. "बाळा आजपर्यंत कधी काही मागितलं का तुझ्याजवळ, सांग, खरं सांग? आज मागतोय. देणार ना?"

"हो दीन! मागाल ते," तिला मघाचा भव्य पुरुष नाना दिसला होता.

"मला गुरुदक्षिणा देणार ना?"

"हो! ते माझं कर्तव्य आहे. मला द्यायलाच हवी." नाना अगदी निकट आले. त्यांनी तिला एकदम मिठीत घेतलं. आणि त्यांचे थरकणारे ओठ कानाशी कुजबुजले "हीच गुरुदक्षिणा."

गुरुदक्षिणा! गुरुदक्षिणा!

तिचं काळीज बोलत होतं. दान असं असतं? तिथं देणारा सुखी असतो. घेणारा कृतार्थ असतो. इथं सारीच अतृप्ती, बेचैनी, असं का? तसं असेल तर हे दान कसलं?

पण हे दान कुठाय? ही दक्षिणा, कुणाचा तरी हा हक्क आहे. हक्क म्हणून त्यानं ती घ्यायची. 'दक्षिणा' 'दक्षिणा' आणि तिची शुद्ध हरपली होती.

रंगमंदीर उजळलं होतं. मोठी मोठी माणसं तिथं उभी होती. एकतर भारतभाग्यविधातासुद्धा होता. हजारो प्रेक्षक गण तो सोहळा सकौतुक पहात होते. आनंदाला उधाण आले होते. अध्यक्षीय खुर्चीच्या बाजूला नानांचं आसन होतं. नाना काळचा चष्म्याआडून सारा परिसर न्याहाळात होते. किती बरं वाटत होतं त्यांना. नाना ह्या कार्यक्रमाचा केन्द्रबिंदू होते. साऱ्यांच्या कौतुकाचा विषय. साठी आली तरी नाना गुलजार दिसत. तांबूस गाल आणि काळेभोर केस चाळीशीतल्या सुखलोलुप मदनमस्त नानांकडे पाहून 'किती गोडाहेत' असं म्हणून डोळे मोडीत होत्या. वक्षावरचे पदर पाडीत होत्या. त्यांना वाटायचं हा महान माणूस आपण अट्टाहासानं रोखून धरलेलं गोवर यौवन पाहील. नुसत्या कल्पनेनं भारावत होत्या. कितीतरी शिष्यवर, हितचिंतक

अनुक्रमणिका

आसावल्या नजरांनी पाहत होते. नाना आज 'पद्मभूषण' झाले होते. गेल्या तीस वर्षांच्या नाटयसेवेला आज राजमान्यता मिळाली होती. नानांची छबी आज काढताना फोटुवाला म्हणाला "साठ वर्षांचा चिकना म्हातारा." नाना सुखावले होते. रंगमंचावरचा प्रत्येक वक्ता नानांची स्तुतीसुमनांनी पूजा बांधीत होता. नाना बेफिकीरीतच ऐकत होते. यश त्यांच्या दारी नेहमी उभे असायचे. आज त्यानं पायी लोटांगण घातलं होतं. किती नाटयसंस्थांनी, सामाजिक संस्थांनी हार घातले. कुणी युगंधर म्हटलं. कुणी सम्राट म्हटलं. त्या कौतुकात नाना वय विसरले. बाजूला सौभाग्यवती बसली होती. नानांनी तिचा दंड जोरानं दाबला. सौ. हसली नि कानात म्हणाली "हे काय, शोभा पाहील ना! ती पहा पुढच्या रांगेत" नानांनी पाहिलं. ती तीच होती. तेच डोळे. तीच कर्दळीच्या देठासारखी मान. स्थिर नजरेनं पहात होती. जमावात असून नसल्यासारखी. विरक्त तरीही आसक्त. नाना अस्वस्थ झाले. ती संथ नजर टाकू लागले. सभेत अजुनी शब्द चुरमुऱ्यासारखे उधळले जात होते. अगदी हजारोंनी. नानांच्यातला कलावंत एकदम क्रूर झाला. आणि त्यांच्यातल्या माणसाचा गळा दाबायला लागला. नानांचा जीव घुसमटायला लागला.

कार्यवाहानी म्हटलं 'पद्मभूषण, आपलं भाषण' नाना उठले. टाळ्यांचा कडकडाट झाला. "इश्श, आत्ता काय बोलतील नि काय?" 'अय्या गाल बघ' पुन्हा शब्द लाजले. पण नाना पराभूतासारखे बोलायला लाजले "हे यश तुमचं आहे. प्रेक्षकांचं ऽ मी सामान्य, कीटक, त्याचा पर्वत तुम्ही केला!' नाना खाली बसले. टाळ्यांचा कडकडाट झाला. गर्दी पातळ झाली. सौभाग्यवती मैत्रिणींबरोबर कुठंतरी गेल्या. चारदोन खाशी मंडळी नानांच्या भवती फेर धरून होती. आणि एवढ्यात ती आली. नाना घाबरले. अगदी केविलवाणे झाले.

"येना बाळा, कुठं होतीस इतके दिवस! ती म्हणाली "सारं सांगते".

"चल रंगपटात" नानांनी तिला रंगपटात नेलं. कंठ रूद्ध झाला." शोभा क्षमा कर. मी तुला विसरलो.

"पण मी नाही विसरले तुमच्यासाठी आज भेट आणलीय."

नानांना धीर आला.

"काय आणलंयस?" नाना अधीर झाले. तिनं गुलाबी कागदात बांधलेली एक फोटोफ्रेम त्यांना दाखविली. नाना एकटक पहात होते.

"तूझं मूल!"

"हो माझं मूल!" ती शांत होती.

"लग्न कधी झालं?"

"गेल्या वर्षी 'नाटय महोत्सवात."

"काय बोलतेस?"

"खरं बोलते.त्या रात्री आपल्याबरोबर" तिला बोलवेना.

"बस बस! पुरे कर, विसरून जा. विसरून जा."

"कसं विसरू?"

"पण अखेर माझा काय संबंध? तुम्ही नाटकातल्या मुली दहाजणाशी संबंध?"

"नाही हो ऽ" ती कळवळली.

"नानांनी निश्चय केला. झटकन् रंगपटाचं दार उघडून ते बाहेर आले. अजुनी हाडाचे रसिक तिथं रेंगाळत होतेच. नाना त्यांच्या जवळ जात ओरडले. "मंडळी खूषखबर ऐका, आम्हाला नातू झालाय. अरे ही शोभा आमची मानस कन्या ना. नाटकातलं असलं म्हणून काय झालं? नातं आहे ना ते!" नाना छान संवाद बोलले. रसिकांनी टाळ्यांचा कडकडाट केला. तिला जवळ खेचून नानांनी ते छायाचित्र साऱ्यांना दाखवलं. "कसा आहे बेटा?"

सारी जणं तिच्याकडे पहात होती. कौतुकानं. समाधानानं. जवळ पडलेल्या पुष्पगुच्छांच्या ढिगाऱ्यातला एक टपोरा गुच्छ तिच्या हातात देत नाना म्हणाले,

"असू दे राजाला, बाळा."

ती अवाक् झाली. "पद्मभूषण" ही अक्षरं अश्रूत वेडीवाकडी मिसळली, "येते हं ऽऽ" ती बोलायचं म्हणून बोलली. निर्बन्ध झालेली आसवं गालावर ओघळली, "मी बाळाची, मी बाळाचीच" अन्तरात खोल कुणीतरी बोलत होतं. ती झटकन् वळली. मघाच्या टाळ्या वाजविणाऱ्या नजरा तिला पाठमोरी न्याहाळत होत्या. कुणीतरी आवाज चढवून म्हणालं "वा! वा! नाना! काय पोरगी आहे!"

"अख्ख्या मुंबईत अभिनयात हिचा हात धरणारी दुसरी कुणी नाही."

"अहो आत्ता रडली ना, तितकंच खरं रडते हो ती नाटकात, वा! लाजवाब!"

कुणीतरी पुस्ती जोडली

आणि रंगमंदिरातले दिवे पुन्हा उजळले, दुसऱ्या नाटकासाठी.

● ● ●




—दादूमिया

**... वृत्तपत्रे आज व्यापारी वृत्तीची झाली आहेत. 'मागणी तसा पुरवठा' हा धर्मच आहे व्यापारात. साहजिकच वृत्तपत्र-व्यवसाय राजकारणाचा साहाय्यक उद्योग झाला आहे.**

[ उत्तरार्ध ]

भारताच्या प्राचीन इतिहासातील बराच कालखंड साधनांच्या अभावी अज्ञात आहे अशी ओरड रोज ऐकू येते. कित्येक वेळा मनात येते, बरे आहे अज्ञात आहे ते. नाहीतर, कोणास ठाऊक, कायकाय भानगडी व विकृती बाहेर आल्या असत्या आमच्या पूर्वजांच्या? कारण बखरीकार सत्यच लिहितील यावर आपला विश्वास नाही. नाहीतर 'हिंदूपतपातशाहीचे सम्राट' व 'डोंगरातील उंदीर' ही परस्परविरोधी विशेषणे शिवाजीमहाराजांना कां दिली जावी? मुसलमान इतिहासकारांनी रानटी गुलाम वंशाच्या राजांना केवढे महान् बनविले आहे? जर इंग्रज उपरे तर मोगल बादशाह उपरे नाहीत का? पण त्यांच्या वर्णनांनी इतिहासाच्या पुस्तकात केवढी गर्दी केलेली आढळते! राजपूत राजे श्रेष्ठ, बलाढ्य, शूर वगैरे वर्णन आपण ह्या राजपूतांच्या भाटांनी केलेल्या रासोत वाचतो. वास्तविकदृष्ट्या या राजपूतांनी मोगल बादशहांचे सिंहासन बळकट केले. त्यामुळे ते अदूर दृष्टीचे, मूर्ख, अप्पलपोटे, स्वार्थी व देशद्रोही ठरावयास पाहिजेत. पण त्यांच्या भाटांची असे काही लिहावयाची टाप होती का? "त्यांना काय वाटेल?" हा प्रश्न त्या भाटांना, त्या बखरीकारांना त्यावेळीही सतावत होता. पण विद्वान लोकांना एवढा विचार करावयास वेळ कोठे असतो? त्याच बखरींचे, काव्यांचे, स्तुतिस्तोत्रांचे उतारेच्या उतारे हे विद्वान इतिहासकार उद्धृत करतात व देशाचा इतिहास "निर्माण" होतो.

हे आपल्याच देशात चालते असे नाही. मानवी स्वभाव इथूनतिथून सर्वत्र सारखाच. चामडीच्या रंगात फरक पडला तरी सर्व माणसांना तेच विकार, त्याच व्याधींनी ग्रस्त केलेले असते. पूर्वग्रह, स्वार्थ, 'त्यांना काय वाटेल?' ही भीती, ढोंग, पदव्या वा सत्ता यांचा मोह, पैशांचे प्रलोभन फक्त हिंदी वार्ताहरानाच असतात व परदेशी गोऱ्यांजवळ त्यांचा साठा बिलकूल नसतो अशातली बात नाही. गांधीजींना हे सत्य चांगले ठाऊक होते. म्हणून त्यांनी लुई फिशरसारख्या अमेरिकन वृत्तपत्रीय व्यवसायी लोकांना महत्त्व दिले. गांधीजी परकीय गोऱ्या चामडीच्या वार्ताहराना आधी भेटतात अशी ओरड आपल्या वार्ताहरांनी बऱ्याच वेळा केली. गांधीजींनी त्यावर मोठे सुन्दर भाष्य केले. ते म्हणाले, "भारतीयांना मी कसा आहे ते माहीत आहे. पण माझ्या मतांचा प्रभाव परदेशीयांवर पाडावयाचा असेल तर मला त्यांना भाव दिलाच पाहिजे." सावरकरांनी याच्या उलट संधी मिळेल तेव्हा परदेशीय वार्ताहरांना कडक उत्तरे देऊन कापून घायाळ केले. नेहरूंनी या बाबतीत गांधीजींचाच वारसा पुढे चालविला, नव्हे, त्यांनी आंतरराष्ट्रवादाचा पुरस्कार करीत करीत स्वतःचे नांव ह्या वार्ताहरांच्या मदतीने साऱ्या दुनियेभर गाजवून टाकले. विशेषतः स्त्री-वार्ताहर पंडितजींवर खूष खूष असत! पंडितजींचा वारसा अगदी दीडदमडीचे अंगठा-छाप पांढरे टोपीवाले राजकारणी लोकदेखील त्याच निष्ठेने चालविताना पाहून राजकारणात पेटंटचा कायदा नाही याची मनास राहून राहून खंत वाटते.

गांधीजींनी सी. पी. स्कॉट् किंवा रेव्ह. सी. एफ. अँड्र्यूज् यांना जवळ केले त्याचा प्रत्यक्ष फायदा काँग्रेसवाल्यांना त्यावेळी स्वतःच्या डोळ्यांनी पहावयास मिळाला. या दोघांनी इंग्लंडमध्ये भारताच्या बाजूने "पब्लीक ओपीनीयन" जागृत केले ही गोष्ट निर्विवाद. हा फायदा सावरकर, रॉय, सुभाषचंद्र बोस किंवा प्रेसिडेंट राजेंद्रप्रसाद वा राधाकृष्णन् यांनाही लाभू शकला नाही! अँड्र्यूजसाहेब त्यावेळी 'मँचेस्टर गार्डीयन'चे वार्ताहर होते. त्यांची भारतभक्ती महशूर आहे. दुर्दैवाने त्यांनी केलेली सारी भाकिते काळाने खोटी ठरविली. अँड्र्यूज यांचा भारतीय राजकारणाचा गाढा अभ्यास होता. ते बहुधा साऱ्या पुढाऱ्यांना ओळखत असत. जयकर व श्रीनिवास शास्त्री (दोघेही इंग्रजी भाषेचे शिवाजी!) भारतीय राजकारणात अग्रेसर राहणार असे अँड्र्यूजसाहेब वरचेवर लिहीत. गांधीजींना ते येशू ख्रिस्ताचा अवतार समजत. जीना व गांधीजी यांचे मीलन होईल असे ते मानीत. भारतास फक्त "डोमीनीयन स्टेटस्" दिले की भारतीय पुढारी खूष राहतील ही त्यांची अटकळ खोटी ठरली. त्यांची भविष्ये त्यांच्या रोजच्या अभ्यासातून निर्माण झाली होती. म्हणजे त्यांचा अभ्यास कोणच्या पातळीचा असावा हे लक्षात येईल! आणि हे 'मँचेस्टर गार्डीयन'चे जुने अंक बघून कोणी इंग्रज वा कोणी भारतीय विद्वान काही निराळे निष्कर्ष काढील व मोठ्या अभिमानाने म्हणू शकेल, "साहेबाचे त्या वेळेचे Eye Witness असलेले रिपोर्टींग आहे, आणखी काय पाहिजे?"

साहेब म्हणजे ईश्वराचा अवतार असे अजून आपल्याला कां वाटते ते मला समजत नाही. साहेबाने म्हटले म्हणजे अधिकारी ठरते, ग्राह्य, जगन्मान्य होते. साहेबातही "उडदामाजी काळेगोरे" असू शकतात ह्यावर अजून आमच्या काळ्या लोकांचा विश्वासच बसत नाही. अर्धे तरुण परदेशी जाऊन पदवी घेऊन येतात यामागे येथील लोकांच्या ह्या भोळ्याभाबड्या समजुतीचा गैरफायदा घेणे हा हेतू असतो. साहेब भारतीयापेक्षा निराळा नाही ह्याची दोन उदाहरणे दिल्याशिवाय हा लेख पूर्ण होऊच शकणार नाही.



अनुक्रमणिका

वॉल्टर ड्यूरांट हा 'न्यूयॉर्क टाईम्स'चा जगप्रसिद्ध वार्ताहर. हा १९३२–३३ साली मॉस्कोत होता. ह्या वेळी मॉस्कोत फार भयंकर दुष्काळ पडला होता. याचा पुरावा प्रत्यक्ष क्रुश्चेव्हनेच दिला आहे. मात्र त्यावेळेस ड्यूरांटसाहेबाने न्यूयॉर्क टाईम्समध्ये लिहिलेली वातमीपत्रे आजही जुन्या फायलीत उपलब्ध आहेत. मॉस्कोचे त्यावेळचे इतके झक्क वर्णन ड्यूरांटने केले आहे की लोकांना वाटावे, मॉस्को म्हणजे नंदनवनच आहे. ड्यूरांटचे वर्णन असे : " far from there being any famine as a result of collectivivisation, the granaries were bursting, the milkmaids were apple-cheeked, the peasants were stuffing themselves with good things." सत्ताधारी पक्षाजवळ आपल्या रामराज्याचे कौतुक करणारे फोटो व स्टॅटीस्टीकल् फिगर्स नेहमीच तयार असतात. ड्यूरांटने त्यांची रेलचेल आपल्या वातमीपत्रातून दिली होती. वृत्तपत्रीय थापेबाजीचा हा जागतिक विक्रम म्हणावा लागेल !

राजकारणात पराभव नेहमीच 'अनाथ' असतो. त्याउलट विजयास अनेक पिताश्री आढळतात ! हिटलरचा पराभव झाल्यापासून एवढ्या मोठ्या धडाडीच्या सेनानीस पाश्चात्य व रशियन इतिहासकारांनी अक्षरशः पशू, रानटी व अक्कलशून्य पण महत्त्वाकांक्षी युद्धपिपासू ठरविले आहे. हिटलर जिंकला असता तर हीच विशेषणे चर्चिल, द गॉल व स्टालीन यांना दिली गेली असती. सुभाषबाबूंची कोहीमाच्या जयानंतर पीछेहाटच होत गेली. त्यामुळे आमचे भारतीय विद्वान् ह्या अद्भुत राष्ट्रभक्ताला सेनानीही मानावयास तयार नाहीत. अगदी सुभाषबाबूंच्या तैनातीतील खास माणसेदेखील आज मूग गिळून स्वस्थ बसून आहेत. द्रौपदीवस्त्रहरणाच्या वेळी कौरवांच्या दरबारातील वुढ्ढे लोकांप्रमाणे !

युरोपातील महायुद्धाचा प्रसिद्ध सेनानीनी लिहिलेला "आँखो देखा हाल" असाच विसंगत वाटतो. ग्रे हा ग्रंथकार त्यामानाने सच्चा वाटतो. पहिले महायुद्ध कां झाले ? ग्रे प्रांजळपणे कबुली देतो : "The real reason for going into the war was that if we did not stand by France and stand for Belgium against this aggression we should be isolated, discredited and hated : and there would be before us nothing but a miserable and ignoble future." त्याच्या उलट साम्राज्यवादी चर्चिलसाहेबांचे म्हणणे आढळते. आपल्या सुन्दर शैलीत चर्चिल आपल्या देशाच्या साम्राज्यवादाची तरफदारी पुढील शब्दात करतात : "Once more now in the march of centuries Old England was to stand forth in battle against the mightiest thrones and dominations. Once more in defence of the liberties of Europe and the common right must she enter upon a voyage of great foil and hazard across waters un-charted, towards coasts unknown, guided only by the stars. Once more the 'far-off line of storm-beaten ships' was to stand between the Continental Tyrant and the dominion of the world."

चर्चिलसाहेबांचे सोडा पण डॉ. राधाकृष्णन् यांनी मॉस्कोत भारताचे राजदूत असताना एका भाषणात व एका लेखात स्टालीनचे स्वागत "शांतिदूत" म्हणून केले होते. डॉ. राधाकृष्णन् साम्यवादी आहेत असा आरोप त्यांचा शत्रूही करणार नाही. पण आजुबाजूच्या वातावरणाकडे कानाडोळा मोठमोठ्या व्यक्ती कशा करू शकतात ह्याकडे लक्ष वेधावेसे वाटते. भारतीय संस्कृतीचे प्रतिनिधी चीनला भेट देण्यास गेले होते. आल्यावर त्या सर्वांनी चीनची कोण स्तुतीस्तोत्रे गायली होती ! ताश्कंद कराराच्या आधी व नंतर प्रसिद्ध झालेले अंक अभ्यासूंनी खास चाळण्यासारखे आहेत. ताश्कंद करारानंतर केवढा पाकिस्तानचा पुळका आला या पत्रांना ! तसाच प्रेमाचा पुळका स्वतंत्र पक्षाच्या सर्वच वृत्तपत्रांना पाकिस्तानच्या बाबतीत येत असतो. याचा अर्थ उघड आहे. प्रचाराची माध्यमे "विकत" घेता येतात. प्रत्येकाची किंमत निराळी ! कोणी पैशाने वश होतात, कोणी पोरींच्या मोहास्त्राने, तर कोणी आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या प्रलोभनाने. मॉस्कोस भेट देऊन आल्यावर सर ज्यूलीअन हक्सलेसारखा लेखक लिहितो, "रेल्वे मार्शलींग यार्डमध्ये स्टालीन जाई व तेथील कामगारांशी हस्तांदोलन करी ! गार्डीयनची खास वार्ताहरीण सौ. निओमी मीचीसन मॉस्कोच्या श्रीमंतीचे वर्णन करते : "मॉस्कोत लौकरच ब्रेड फुकट वाटण्यात येणार आहे. लंडन टाईम्सचा वार्ताहर आपल्या वातमीपत्रात लिहितो, "मॉस्कोमध्ये गाड्या घेण्यासाठी रांगाच्या रांगा दिसून येतात." रशियाची नेमकी एवढीच श्रीमंती या वार्ताहरांना दाखविली गेली असेल ! लागलीच हे वार्ताहर हुरळले व 'आँखो देखा हाल' लिहावयास बसले. नेहरूंनी मॉस्कोच्या भेटीनंतर इंदिरेस अतीव हुरळून पत्रे लिहली आहेत. ती आजही Glimpses of World History मध्ये पहावयास मिळतात. सर हक्सले काय किंवा पं. नेहरू काय, दोघांचा हुरळण्याचा मानवी स्वभाव एकच एकंदरीत ! प्रा. ना. सी. फडक्यांनी शेख अब्दुल्लांच्या 'स्टेट' आदरातिथ्यावर भाळून अजान थाटात शेखसाहेबांचे कौतुक करणारी 'अल्ला हो अकबर' ही कादंबरी लिहिली. आज त्यांना पुन्हा काश्मीरात धाडले तर त्यांच्या कादंबरीत सादीकसाहेबांचे कौतुक आढळून येईल ! !

इतिहासात सत्य तौलनिक असते. राष्ट्राच्या राजकीय मतप्रणालीवर त्या त्या राष्ट्राचे प्रचाराचे धोरण ठरते. १९६५ च्या भारत-पाक युद्धात ब्रिटन व अमेरिका यांनी सरळ पाकिस्तानास आपापल्या रेडिओ व वृत्तपत्रे यांच्या द्वारे पाठिंबा दिला. "टाईम" हे अमेरिकेचे जगप्रसिद्ध साप्ताहिक. त्यावेळेस ह्या "टाईम" साप्ताहिकाने काहीही कारण नसताना भारताविरुद्ध गरळ ओकून मुंबई, दिल्ली व कलकत्ता येथील अमेरिकेच्या भगत लोकांना अस्वस्थ करून सोडले होते. त्यावेळेस प्रस्तुत लेखकाने टाईमच्या संपादकास पत्र लिहिले होते. टाईमच्या संपादकाने त्यावर टाईम व अमेरिका यांचे परराष्ट्रीय धोरण कसे निगडीत आहे ह्यावर भाष्य करणारे



अनुक्रमणिका

सुन्दर पत्र लिहिले होते. त्याचा प्रत्यय अरब-इस्राएलच्या युद्धात आला. भारतीय वृत्तपत्रांनी ज्यूंच्या विजयाविषयी कौतुकाचे उद्‌गार काढताच ईजिप्तच्या वृत्तपत्रातून भारत-विरोधी मोहीम सुरू झाली. ईजिप्तच्या दिल्लीतील बातमीदाराला तावडतोब भारताचे दारिद्र्य, लुच्चेपणा, जातीयवाद, भ्रष्टाचार व लाचलुचपत दिसू लागली. त्याची बातमीपत्रे भारतात वाईट काय गोष्टी पहावयास मिळतात याचा कॅट्‌लॉग होऊ लागली. भाईभाईचे रूपांतर एवढे कटुतेत व्हावे हे आश्चर्य नाही काय?

भारतात हिंदू उर्दू शिकत नाहीत. त्यामुळे उर्दू वृत्तपत्रातून भारताविरुद्ध कसा व किती खोटा प्रचार होतो त्याची कल्पना येत नाही. सध्या कोणी हैदराबादचे देशपांडे केसरी, विवेक व ऑर्गनायझर या पत्रातून उर्दू पत्रातील खास उतारे मराठी व इंग्रजी वाचकांसाठी प्रसिद्ध करतात. ते वाचले की अजूनही भारतीय मुसलमान तुर्की गोंडेदार लाल टोपी घालूनच वावरत आहेत असा भास होऊ लागतो. एवढा जहरी व खोडसाळ मजकूर भारत सरकार प्रसिद्धच कां करून देते ते समजत नाही. असा खोटा 'आँखो देखा हाल' पाकिस्तानी वृत्तपत्रे उद्धत करतात व प्रचाराच्या बाबतीत भारतावर मात करतात!

भारतात जातीय दंगे हल्ली नियमित होतात. त्यांचा 'ऑर्गनायझर' किंवा 'केसरी'तील अहवाल व रेडिओ पाकिस्तान अथवा पाकिस्तान टाईम्सचा Eye Witness Report ताडून पहावा. दोन्ही अहवालांमध्ये दोन ध्रुवांचे अंतर पहावयास मिळते. ब्लिट्झ व लिंक आणि करंट, स्वराज्य किंवा एनलाईट यांचेही अहवाल असेच परस्परविरोधी व विसंगत आढळतात. बऱ्याच वर्षांपूर्वी लिंकने दीनदयाळजी व वाजपयीजी यांच्यात मतभेद वाढून मोठे वितुष्ट निर्माण झाले आहे असा संपूर्ण एकपानी रिपोर्ट प्रसिद्ध केला होता. मी ते कात्रण दीनदयाळजींना दाखवून हळहळ व्यक्त केली. त्यावर ते हसून म्हणाले, "ये तो लिंककी जुनी चालबाजी है। हम दोनों झगडा करें और जनसंघ दुर्बल हो जायें ये उनकी तमन्ना दिखाई पडती है। आप जैसे भी मिसगाईड् होते हैं तो सामान्य रीडरोंकी क्या कथा?"

अनुल्लेखाने विरोधी पुढाऱ्यास नामोहरम करायचे तंत्र नवीन आहे. जॉर्ज फर्नांडीस यांचे मुंबईच्या संपावरील लोकसभेतील भाषण अतिशय उत्कृष्ट होते. त्यासाठी त्यांनी सतत तीन महिने अभ्यास केला होता. टाईम्स व इंडियन एक्सप्रेसने त्याचे वर्णन एका ओळीत केले: " George Fernandis also spoke वा: रे, 'आँखो देखा हाल' प्रसिद्ध करण्याचे तंत्र! याच पद्धतीने मधु लिमयांची सारी भाषणे अभ्यासू व माहितीपूर्ण असतात. तरीही इंग्रजी वृत्तपत्रे त्याविषयी एक अक्षरही लिहीत नाहीत. मात्र त्यांनी हुल्लडबाजी केली, आरडाओरड केली, अन्पार्लमेंटरी शब्दांचा वापर केला वगैरे बातम्या हीच वृत्तपत्रे तावडतोब प्रसिद्ध करतात! जनसंघाच्या वाजपेयींखेरीज इतरांना प्रसिद्धीचे भाग्य क्वचितच मिळते! त्यामानाने मुस्लीम लीग खूपच भाग्यशाली आहे.

हे "आँखो देखा हाल" असेच प्रसिद्ध होत राहतील. कारण पक्षांच्या पुढाऱ्यांना त्या जातीच्या अहवालांचीच जरूरी असते. वृत्तपत्रे आज व्यापारी वृत्तीची झाली आहेत. "मागणी तसा पुरवठा" हा धर्मच आहे व्यापारात. लोकशाहीत राजकारणाचाही व्यापार होत असतो. साहजिकच, वृत्तपत्र व्यवसाय राजकारणाचा साहाय्यक उद्योग झाला आहे. तोपर्यंत हे "आँखो देखा हाल" हे असेच Made to order राहणार. पण हे माहीत असले तरी लोक ही खास बातमीपत्रे वाचायचे थोडेच बंद करणार आहेत? • • •

अनुक्रमणिका

# खानदान

—मोहिनी वर्दे

तिच्या प्रीतीसागरापुढे तिचं खानदान अगस्तीसारखं पुढे ठाकलं होतं; तिच्या घराण्यासकट, तिच्या प्रियतम बहिण-भावंडांसकट तिच्या अवघ्या अस्तित्वाला पिऊन टाकायला ते उद्युक्त झालं होतं……

इनामदारांच्या वाड्यावरून आसमंतात नजर टाकीत सारजा उभी होती. तिच्या खिडकीतून समोर पसरलेली बलदंड कणसांची शेती वाऱ्यावर डुलताना दिसत होती. समोर दोन टेकड्यांच्या मधोमध खिड, त्या खिडीतलं झाड दोन भिवयांमध्ये वैष्णवी टिळ्यासारखं उभं होतं. तिनं दृष्टी आत वळवली. खोलीतली कृष्णाची हसरी मूर्ती सूर ओतू लागली. सारजाच्या मनाच्या गाभाऱ्यातून त्याचे प्रतिध्वनी उमटू लागले. तिने मूर्तीच्या गळ्यातला चंदनाचा हार सारखा केला. उदबत्ती लावली. समईत तेल ओतलं आणि भगवद्गीतेचं पुस्तक पुढे ओढलं.

गीतेच्या पारायणाला गणती नव्हती. अजून ! अस्खलीत, न अडखळता घडघड म्हणता येत नसे. डोळ्यासमोरून शब्द सरकत पण तोंडातून ओघळत नसत.

वराच लांबचा पल्ला गाठायचा होता. खोलीतल्या फळ्यावरून पुस्तकं एकमेकांना लगटून उभी होती. श्रीधराच्या भारतापासून तुकाराम, रामदास ते रानड्यांपर्यंत पुराणाच्या आणि तत्त्वज्ञानाच्या सर्व मराठी ग्रंथांनी खोली भरली होती.

सरस्वतीच्या बैठकीच्या पांढऱ्या कमळपाकळ्यांकडे ती एकात्मतेने पाहात होती. कमळाला इतक्याच पाकळ्या कां ? जास्त कां नाहीत ? कमी कां नाहीत ?

अंतला परागकोष कुठे असेल ? कसा निर्माण झाला असेल ?

यातली पहिली पाकळी कुठली ? शेवटली कुठली ?

प्रत्येक दृश्याच्या अंत, गाभ्यात शिरण्याचा हा छंद तिला केव्हापासून लागला कोण जाणे !

इनामदारांच्या खानदानी घराण्यातली सारजा सर्वात मोठी. पहिलं अपत्य. तिच्या पाठोपाठ वाडा बाळलेण्यांनी, इवल्या पावलांनी गोकुळासारखा भरला. श्रीधरपंत एकटे होते. त्या पुरातन लौकिकाचा, वैभवाचा आणि कुळाचा ते एकमेव आधार होते. सारजेच्या जन्माबरोबर मुलगी असली तरी घराण्याला अंकुर

फुटला म्हणून ते समाधानाने डंवरले. मागाहून तीन मुलगे आणि चार मुली असा वंशवृक्ष फोफावला.

सारजेची आई शेवटल्या वाळंतपणात फळ तुटावं अशी अलगद् देवाकडे गेली. तेव्हापासून सारजा घराची लक्ष्मी होती. आगळीक घडली म्हणजे पोरं वापाजवळ रदबदली करण्यासाठी सारजेकडे येत असत. आणि वहिणींचे रुसवे फुगवे, सारजा समजूत घाली तेव्हा कुठे मिटत. आपल्या सायीसारख्या मऊ हाताने त्यांची वेणी-फणी करी. आणि वाड्यावर येणाऱ्या पाहुण्याला खडीसाखर घातलेला कसदार दूधाचा चांदीचा प्याला तोलामोलाप्रमाणे सारजेच्या हुकुमाने दिला जाई.

पण सारजा ह्या सर्वांत राहून निराळी होती. भजन, कीर्तन, पोथीवाचन, तिच्या वयाला न साजेशा गोष्टींचा तिला छंद ! नव्हे, केवळ छंद नव्हे, ध्यास होता.

पाण्यात राहून कमलपत्राप्रमाणे कोरडी !
घाटीव आयुष्याची कोरीव मूर्ती !

ती हसली म्हणजे तिच्या हास्याच्या लहरी ऐकणाऱ्याला भारून टाकीत आणि नंतर त्या वेगळ्या होत दूर दूर जात. चार माणसात रमलेली सारजा त्यांच्यातून उठून गेली; म्हणजे पाहाणाऱ्याला ही कधी आपल्यात नव्हतीच असे वाटे. गायकांनी सुरांच्या दुलईत शिरावं तशी सारजा ईश्वरभक्तीत गुरफटून जाई. जणु ती पहिल्यापासून तिथेच होती.

मधलीसाठी, मंजुळेसाठी श्रीधरपंतांनी स्थळ सुचवलं होतं. सारजेनं सकाळपासून तयारी केली होती. वाड्यावरची बैठक सजवली होती. शोभेच्या पितळेच्या वस्तू लखलखत होत्या. जमिनी ताज्या शेणाने सारवल्या होत्या. त्या वासात धुपाचा वास मिसळत होता. देवघरातून येणाऱ्या फुलांचा वास मधून दरवळत होता. फराळाची ताटं भरून वाट पाहात होती. पाहायला आलेल्या मंडळींची यथोचित उठवस झाली. सदोदित ईश्वरभक्तीनं भारलेल्या त्या मीरावाईचं व्यवहाराचं इतकं नीटस ज्ञान पाहून श्रीधरपंत सुखावले होते. मंजुळा मुलाला पसंत पडल्याची ग्वाही दाराआडून समारंभ पाहाणाऱ्या सारजेनं श्रीधर-पंतांना दिली होती. कुठे खोड काढायला जागा नव्हती. खानदानीच्या कोंदणात मंजुळा पाचूसारखी चपखल वसत होती.

मुलाकडून उत्तर आलं. पण पंतांनी तिला कवळलं नाही. सारजा मनात उम-जली. देवाच्या पूजेकडे लक्ष लागेना. फक्त आज तिच्या तत्त्वज्ञानाने तिला धीर दिला. कुठेतरी गफलत झाली होती. कुठे ? कां ? कसं शक्य आहे ?

मंजुळेचे भरून अलेले डोळे विसरता येत नव्हते. आज मंजुळा सारजेच्या कुशीत शिरली नाही, डोळ्यांनी वोलली नाही, स्पर्शाने ओलावली नाही. ढग येऊन न वरसता आकाश कोरडं व्हावं तसं काहीसं मंजुळा वागली होती.

रात्री पंतांनी सारजेजवळ खुलासा केला.

"घरात मोठी अहे कळलं नव्हतं. तिच्या आधी धाकटीचं उरकून घेणार म्हणजे घराण्यात दोप आहे. अशी लग्नं खानदानीत होत नसतात."

अनाठायी घाव वसला होता. मोठीचं झालं नाही तर धाकटीचं होणार नाही. छे ! मोठीला करायचं नसलं तरी धाकटीचं होणार नाही. तिचा काय अपराध ? आणि सारजेचा तरी काय होता ? भक्तीचा अनोखा छंद जन्माला येताना ती घेऊन आली होती. ती मुरलीधराची मूर्ती, पाषाणमूर्ती; तिच्या लेखी चालती बोलती प्रतिमा होती. ती मनोमन जाणून होती. कुडीत असेपर्यंत प्राणांची पाखरं हृदयस्थ परमेश्वरासाठी तडफडणार होती. शेवटी त्याच्या कुशीत विसावणार होती. अव-काशाच्या पोकळीत निळाई सजावी तसा तिच्या मनात घननीळ रुजला होता.

पानांचा रंग हिरवा असला म्हणून तिथे रंगीबेरंगी फुलं उमलत नाहीत का ? त्यांना वहरू द्या डोलू द्या. माझ्या वहिणींनी लौकिक अर्थाने खुलू नये का ? मंजुळेची अगतिक नजर काळीज चरचरा कापीत गेली. प्रत्येकाने लग्न केलेच पाहिजे का ?

माझा हा ध्यास जगावेगळा आहे का ?

मला ते तसलं प्रेम नको आहे. मी माझ्या परीने परिपूर्ण जीवन जगत आहे.

किती हौसेने तिने मंजुळेच्या होणाऱ्या सासरची सरवराई केली होती ? काही न्यून राहू नये म्हणून देवाला आळवलं होतं. पण आपण स्वतः अशी आपल्या लाडक्या वहि-णीच्या सुखात अडसर होऊ ही कल्पना तिला आली नाही. ह्या तडीपार जाण्याचा मार्ग दिसत नव्हता. तिला आपल्या वहि-णींना सुखी झालेलं पाहायचं होतं. त्यांच्या सौभाग्यालंकारांनी नटलेल्या मूर्ती पाहून सारजेला आकाश ठेंगणं झालं असतं.

ती त्यांची आई होती. पण ही गोष्ट आवाक्याबाहेरची होती. तिच्या प्रीती-सागरापुढे तिचं खानदान अगस्तीसारखं पुढे ठाकलं होतं. तिच्या घराण्यासकट, तिच्या प्रियतम वहीणभावंडांसकट तिच्या अवघ्या अस्तित्वाला पिऊन टाकायला ते उद्युक्त झालं होतं.

ती उदास होती.

तिच्यासाठी आज जाळीदार परडीतून केशरी देठाची इवली शुभ्र फुलं वाळकृष्णा-वर चढवण्यासाठी, मंजुळेने आणली नाहीत. तिने स्वतःच ताम्हनात हाताला येतील ते गुलाव खुडले बोचणाऱ्या काट्यांनी वेदनेला वाट करून देत.

आज वाफेभरल्या ताटावर तिच्या हातची मुगाची उसळ कुणी नावाजली नाही. किराईतासारखा घास रिचवून सारजा आंचवली.

अच्युतम् केशवम् कृष्ण दामोदरम्... अष्टकाचे सूर उमटले. दीन अवस्थेत ती मुरलीधराला वाट विचारत होती. हा माझा अहंकार अहे का ? असेल, हृद-याच्या तळाशी तो लवलवत असेल. त्याला करपून जाऊ दे.

मी माझ्या भावंडांसाठी वाटेल तो त्याग करायला तयार आहे.

नियतीची ती इच्छा असेल. ईश्वरेच्छा तशी असेल, तर मी विवाह करीन. पण माझ्याबरोबर माझ्या पतीला ही शिक्षा कशासाठी ! माझं शरीर विवाह-वेदीवर चढलं तरी मन अनंत योजने दूर तुझ्या





अनुक्रमणिका

पायाशी पिंगा घालीत राहील. माझ्या पतीशी ही प्रतारणा सदैव होत राहील. त्याला माझा नाईलाज आहे. काया वाचा आणि मनाने एकरूप होण्याच्या विवाहाच्या मंगल सोहळयाला मी विद्रुप कसं करू ? माझा पती माझ्यासमोर हळुवार नाजुक भावनेचा पट उलगडेल तो मी कसा उधळून लावू ? जन्मभर त्याची फसवणूक करण्याचा मला काय अधिकार ?

उध्वस्त मनाने तुझी पूजा रचू ?

मी काय करू ? कुठे जाऊ . . . . ?

दिवाणजींनी वर्दी दिली शंकर आला आहे. इनामदारांचे काही आश्रित होते. त्यांच्या वरोवर ते शंकरला मदत करीत. शंकर आश्रित नव्हता. गावात त्याचं स्वतःचं छोटसं घर होतं. आई होती. वडील केव्हाच वारले. उत्पन्न नव्हतंच. घराण्याच्या अभिमानापोटी इरेस पेटून वडिलांनी आपली स्थावर जंगम सावकाराच्या घशात घातली. शेंडी तुटो पारंबी तुटो ही जिद्द. पारंबीऐवजी कुळाचा वटवृक्ष उन्मळून पडला. त्यांचा एकुलता एक मुलगा शंकर.

खानदान असून कवडीमोलाचा.

त्याचं शिक्षणाचं वेड गावात थट्टेचा विषय होता.

"गावचा पहिला वारिस्टर व्हनार जनु !" त्याला त्याची पर्वा नव्हती. त्याच्या डोळयासमोर फक्त एकलव्याची तपश्चर्या दिसत होती.

पंत नसले म्हणजे तेवढयापुरता सारजा पै-पैशाचा हिशोब पाही. व्यथित मनाने सारजा जिन्यावरून खाली आली. व्यवहाराच्या पातळीवर उतरली. शंकरचे तेजस्वी उत्सुक डोळे तिची उदासीनता भेदून गेले. त्याने हात जोडून नमस्कार केला. किंचित् मान लववली. वागण्यात लाचारी नव्हती तरी उद्दामपणा वाटत नव्हता. दगडाच्या आवाजात त्याने पैशाची याचना केली. दिवाणजींना सांगून त्याची नेमलेली रक्कम त्याला दिली.

उणं अधिक वोलण्याचा सारजाचा स्वभाव नव्हता. तरी तिने त्याची माहिती विचारली.

शंकर कर्ज घेत होता. ती देणगी नव्हती. दिवाणजींना खात्री होती. त्याच्या ध्येयाच्या आड कोणचाही बंध येणं शक्य नव्हतं. एका उंच टोकावर उभी असलेली सारजा दुसऱ्या उंच टोकावर उभ्या असलेल्या शंकरकडे निर्वेधपणे पाहू शकत होती. तिची वांझोटी व्यथा आधार शोधीत होती. नियतीने तिला एका भारलेल्या रस्त्यावर खेचलं होतं. पाऊल कुठे कसं पडेल. तिच्या भावंडांचे सुखदुःखाचे धागे भावनांचे पीळ तिच्या सुखात बेमालूम विणले गेले होते. आज ते आवळले गेले आणि तिच्या लक्षात आले.

कुठेतरी मनाशी एक निश्चय झाला. एका चेहऱ्याचे दोन डोळे. एकमेकांना न पाहाता शेजारी नांदू शकतात. जगाचं विव झेलतात.

शंकर उठून गेला. खुर्ची रिकामी होती. त्या रिकामी झालेल्या—कलाकुसरी केलेल्या काळयाशार खुर्चीकडे सारजा कितीतरी वेळ पाहात होती. गादीच्या लाल कापडावर दृष्टी खिळून राहिली. लाल रंग रक्ताचा होता. कल्पना सापासारखी वळवळत गेली. नजर वर भिंतीवर श्रीधरपंतांच्या फोटोवर, त्यांच्या शेजारी असलेल्या आईच्या फोटोवर वळली.

सनईचे सूर घुमले.

होमाचा धूर घमघमला.

आईच्या फोटोतली सौभाग्याची काळी पोत फासासारखी भडसावत राहिली.

अभावितपणे तिचा हात गळयाकडे गेला आणि वोटं गळा चाचपत राहिली.

● ● ●

## यंदा कादंबरी स्पर्धा नाही, पण....
## लेखकांसाठी खास स्पर्धा आहेच !
### पंचविसाव्या दिवाळी अंकासाठी
# विनोदी साहित्य स्पर्धा

**प्रथम पारितोषिक : रु. १२५ ● दुसरे पारितोषिक रु. ७५ आणि तिसरे पारितोषिक रु. ५०**

**'दीपावली'च्या १९६९ च्या दिवाळी अंकासाठी आम्ही खालील योजना सहर्ष सादर करीत आहो :**

- विनोदी साहित्याला विषयाचे कोणतेही बंधन नाही.
- साहित्य स्वतंत्र असले पाहिजे; अनुवाद, रूपांतर नको.
- कवितांचा विचार केला जाणार नाही. कविता पाठवू नयेत.
- परीक्षकांचा निर्णय अंतिम राहील. एखाद्या क्रमांकाला योग्य असे साहित्य न आल्यास ते पारितोषिक रद्द करण्याचा अगर विभागून देण्याचा अधिकार परीक्षकांचा राहील.
- परीक्षकांचा निर्णय दिवाळी अंकात जाहीर होईल आणि पारितोषिके मिळालेले साहित्य दिवाळी अंकातच प्रसिद्ध होईल.
- साहित्य दोन ते तीन हजार शब्दसंख्येच्या मर्यादेतच असले पाहिजे.
- साहित्य पाठविण्याची अखेरची मुदत दि. २० सप्टेंबर १९६९ ही आहे. गेल्या वर्षी कादंबरी स्पर्धेची मुदत वाढवून मिळण्यासाठी अनेकांनी कळविले होते, पण मुदतवाढ झाली नाही हे स्पर्धकांनी अवश्य ध्यानी घ्यावे.
- नापसंत साहित्य परत पाहिजे असल्यास सोबत पुरेसे पोस्टेज पाठवावे.








अनुक्रमणिका




# चक्रव्यूह

वाचकांचे कुतुहल सतत कायम ठेवणारी चित्तवेधक कादंबरिका

—अशोक ज. आघरकर



"बाई, मी वर्गात येऊ ?"

चारच शब्द; परंतु त्यांनी रजनीच्या शिकवायच्या तंद्रीचा भंग केला. हातात उघडून धरलेलं पुस्तक त्रासिकपणे बंद करून तिनं मागं वळून पाहिलं अन् वर्गाच्या दाराशी उभा असलेला माधव मेहेंदळे तिच्या दृष्टीस पडला. • त्याला पाहताच तिच्या त्रासिकपणाचं रूपांतर रागात झालं अन् ती किंचित तीव्र शब्दात म्हणाली:

"मेहेंदळे, आज पुन: तुला उशीर झाला ?"

"पुनः नाही होणार बाई !"

"पुनः काय होणार नाही ?—गेले सहा महिने तुझं हे वाक्य निदान एक दिवसा-आड तरी ऐकतेय् मी. अकराची शाळा—तर तुला आज यायला अकरापस्तीस झाले जवळजवळ ! तुला शाळेत यायचं नसलं तर येऊ नकोस पण असा मधे व्यत्यय आणून बाकीच्या मुलांचं कां नुकसान करतोस ? ते काही नाही—तुला चांगली शिक्षा केल्याशिवाय तुझं उशीरा येणं बंद व्हायचं नाही. आज मधल्या सुटीपर्यंत तुला वर्गात यायला मिळणार नाही ! दाराशी उभं रहायचं—समजलं ?" अन् त्याच्या उत्तराची वाट न पहाता रजनीनं मान वळवून समोरच्या मुलांकडे पाहिलं अन् पुस्तक उघडत ती म्हणाली, "हं—कुठवर आलो होतो आपण ?"






एका मुलानं संदर्भ सांगितला अन् तो धागा उचलून रजनीनं पुढं शिकवायला सुरुवात केली. थोड्यात वेळात यशवंताची 'आई' कविता शिकविण्यात ती पहिल्याप्रमाणंच इतकी तल्लीन होऊन गेली की तिला वा तिच्या पुढं बसलेल्या मुलांना वेळेचं भान उरलं नाही. मध्यंतरी एक घंटा होऊन गेली परंतु रजनीचे लागोपाठ दोन तास असल्यानं कुणी इवलीही चुळबूळ केली नाही. शेवटी दुसरा तास संपायला पाच-दहा मिनिटं असताना रजनीनं कविता पूर्ण केली अन् त्यातून भानावर येताच तिला एकदम जाणवलं की कुणी तरी हुंदके देत रडतंय् म्हणून. जराशी गोंधळून तिनं वर्गावर नजर फिरवली,

"का रे – कोण रडतं आहे ?"

"बाई, बाहेर मेहेंदळे रडतोय् !" कुठून तरी उत्तर आलं.

त्यासरशी रजनीनं चमकून पाहिलं तो खरोखरच दाराच्या उघड्या फळकुटाला गाल लावून मेहेंदळे हुंदके देत होता – त्याच्या गालांवरून घळघळा अश्रू वहात होते. एव्हाना रजनीचा मगाचचा राग बराच कमी झाला होता – अन् मगाशीही ती चिडली होती ती केवळ शिकविण्यात व्यत्यय आल्यानंच ! माधव मेहेंदळे तसा वर्तणुकीनं चांगला अन् अभ्यासातही हुषार असल्याचं माहीत असल्यानं तिनंही आजवर त्याच्या जवळजवळ रोज होणाऱ्या उशीराकडे दुर्लक्ष करून त्याला शिक्षा अशी कधीच केली नव्हती. त्यामुळं आपण प्रथमच केलेल्या एवढ्या कठोर शिक्षेनं त्याच्यासारख्या हुषार मुलाला वाईट वाटून रडू येणं साहजिकच आहे असा विचार करून रजनी मृदु शब्दात म्हणाली,

"मेहेंदळे – अरे असं रडायचं नाही. चल आपल्या जागेवर जाऊन बस ! अन् पुनः कधी उशीर होऊ देऊ नको – म्हणजे मला शिक्षाही करावी लागणार नाही अन् तुझ्यावरही मागाहून असं रडायची पाळी येणार नाही !"

"बाई, तो म्हणून नाही काही रडत ! त्याला किनई आई नाही– तुम्ही शिकवत असलेल्या कवितेमुळं त्याला आईची आठवण झाली असेल, बाई ! ! !" वर्गातला एक मुलगा म्हणाला.

ते शब्द ऐकून रजनी एकदम चपापली. तसं असण्याचीही शक्यता होती – नव्हे तीच शक्यता अधिक होती. कारण आई नसलेल्यांना 'आई' या शब्दाचा उच्चारही किती क्लेशकारक असतो हे तिला स्वानुभावरून माहीत होतं–फार काय आता कविता शिकवतानाही मोठ्या मुष्किलीनं आपल्या भावनांना आवर घालून डोळ्यात जमू पाहणाऱ्या अश्रूंना तिनं रोखलं होतं. कविता संपवून खाली बसताना समोरच्या रांगेतील मुलांचे पाणावलेले डोळे तिला दिसले होतेच – पण काही दबते – अस्फुट हुंदकेही तिनं ऐकले होते. 'बिचाऱ्याच्या घरी सावत्र आई असली तर वेळेवर जेवायलाही नसेल घालीत त्याला – अन् हेच तर त्याला रोजच्या उशीराचं कारण नसेल ना ?' या विचारानं रजनीला माधव मेहेंदळेबद्दल अधिकच सहानुभूती वाटली. तिनं पाहिलं तो मेहेंदळे डोळे पुशीत त्याच्या जागेवर जाऊन बसत होता. त्याला ती काहीतरी म्हणणार एवढ्यात

**आपल्या गळ्यातली साखळी ओढली जात असल्याचं तिला जाणवलं नि तिनं मागे सरून हात फिरवला तोच कुणाचा तरी हात तिच्या हातात सापडला, तो तिनं घट्ट पकडून ठेवून 'चोर–चोर' अशी आरोळी ठोकली आणि....**

तास संपल्याची घंटा झाली– अन् रजनीला पुढचा तास दुसऱ्या वर्गावर होता. क्षणभर विचार करून ती मेहेंदळेला म्हणाली,

"मेहेंदळे, मधल्या सुट्टीत मला टीचर्स-रूममध्ये येऊन भेट !" अन् पुस्तक घेऊन ती वर्गाबाहेर पडली.

"तुझं नांव माधव ना रे ? – अरे बस ना खुर्चीत !"

माधव अवघडल्यासारखा रजनीच्या समोर बसला.

"माधव, तुझ्या घरी कोण कोण असतं ?"

"मी अन् माझा मोठा भाऊ !"

"अन् आईवडील ? – गावाला असतात की काय ?"

"बाई, मला वडील नाहीत – मी अगदी लहान असताना ते वारले म्हणून आई सांगायची ! अन् आई वारल्यालाही आता पाच वर्षं व्हायला आली !"

"मग घरात कोण करतं ? – तुझी वहिनी असेल ना !

"नाही ! दादाचं अजून लग्न व्हायचंय् – तो कामासाठी जवळ जवळ सबंध दिवस बाहेरच असतो ! त्यामुळं जेवणखाण वगैरे सारं मीच करतो !"

"तू करतोस जेवणखाण ?" रजनी त्याच्याकडे पहातच राहिली.

"हो ! आम्ही मधे खाणावळीचा डबा लावला होता–पण त्यातलं अन्न अगदी बेचव असतं – अन् पैसेही फार पडतात – म्हणून मीच मग दादाला बंद करायला लावला डबा ! थोडेसे कष्ट केले की कमी पैशात पोटभर – चवदार जेवण मिळतं !"

"म्हणून तुला उशीर होतो तर–" रजनीच्या हसण्यावर माधवनं किंचित् लाजून-ओशाळून मान खाली घातली.

"ठीक आहे ! तुझा पालक म्हणून तुझा भाऊच सही वगैरे करतो ना प्रगती-पत्रकावर ?–तर मग संध्याकाळी शाळा सुटल्यावर मी तुला चिठी देईन ती तुझ्या भावाला नेऊन द्यायची – न विसरता हं ! जा आता – शाळा सुटल्यावर ये !"

शनिवारी अर्धा दिवस शाळा सुटल्यावर रजनी टीचर्स-रूममध्ये पेपर्स तपाशीत बसली होती. एवढ्यात शाळेचा शिपाई सांगत आला,

"आपटेबाई, तुमच्याकडे कुणीतरी गृहस्थ भेटायला आलेयत् !"

"त्यांना 'गेस्ट-रूम'मध्ये बसायला सांग–म्हणावं मी आलेच!" म्हणत रजनीनं हातातला पेपर तपासून झाल्यावर पेपर्स आपल्या लॉकरमधे ठेवून कुलूप लावलं अन् ती गेस्ट-रूमकडे वळली. झुलतं दार लोटून ती आत शिरताच तिच्या चाहुलीनं समोर खुर्चीत बसलेला पाठमोरा तरुण वळला –








अन् त्याचा चेहरा दृष्टीस पडताच रजनी एवढी चमकली—चपापून गोंधळली की नमस्कारासाठी तिनं जोडलेले हात आपोआपच गळून पडले—तोंडाला कोरड पडून जिभेवर आलेले शब्द ओठांच्या आड अडकून पडले! मात्र त्याही स्थितीत तिला जाणवलं ते एवढंच की समोरच्या तरुणाची स्थितीही आपल्याला पाहून अगदी अशीच झाल्येय् म्हणून! मात्र त्यानं रजनीच्या आधी स्वतःला सावरलं अन् चटकन् उठून उभा रहात, हात जोडून किंचित् हसत म्हणाला,

"मी सुधीर मेहेंदळे—माझा भाऊ माधवच्या वर्गशिक्षिका—"

"मीच आपल्या भावाची वर्गशिक्षिका—रजनी आपटे! बसा नं—" रजनीनंही आता स्वतःला सावरलं होतं. तो खुर्चीत बसल्यावर त्याच्या समोर, टेबलाच्या विरुद्ध बाजूला खुर्चीत स्थानापन्न होत ती पुढं म्हणाली, "मीच आपल्याला मुद्दाम बोलावलं होतं! माधवचं प्रगति-पुस्तक आपण पहात असाल ना—त्यात एक सूचना आहे की महिन्याच्या महिन्याला पालकांनी पाल्याच्या वर्तना-प्रगतिबाबत वर्गशिक्षकांना भेटून—

"असेल बुवा!" तो मनमोकळेपणानं हसून मधेच उत्तरला, "कारण सही करण्यापालीकडे मी कधी प्रगति-पत्रकाकडे पाहिलंच नाही खरं म्हणजे!"

"म्हणूनच तुम्हाला मुद्दाम बोलावणं पाठवलं माधवबाबत—"

"म्हणजे? माधवचा अभ्यास व्यवस्थित असतो ना?—अन् वागणूक?—" त्याच्या घाईघाईनं विचारण्यात शंका डोकावत होती.

"कठीण आहे या प्रश्नांची उत्तरं देणं! तसं म्हटलं तर तो दोन्ही बाबतीत चोख आहे—म्हटलं तर नाही! तुम्ही म्हणाल, त्याचा नंबर तर नेहमी दहात असतो—खरं आहे, पण मि. मेहेंदळे तुमचा भाऊ खरोखरच एवढा हुषार आहे की त्याचा पहिलाही नंबर सहज यावा. पण मला वाटतं त्याला अभ्यासालाच वेळ मिळत नसावा. कारण गृहपाठ त्याचा कधी चुकलायसं मला आठवत नाही—पण त्यानं गृहपाठ बऱ्याचदा करूनच आणलेला नसतो! तो एकपाठी आहे—परंतु घरी त्याला कविता पाठ करायलाही वेळ मिळत नाहीसं दिसतंय्! कारण त्याला प्रथम कविता म्हणायला सांगितली तर कधीच म्हणता येत नाही—परंतु चारसहा मुलांची म्हणून झाल्यावर मात्र तो घडघडा म्हणून दाखवतो! दुसरं असं की त्याला जवळजवळ रोजच शाळेत यायला उशीर होतो म्हणाना! अन् येईल तोही असा घाईनं धावत-धावत की केस धड विंचरलेले नाहीत—वा शर्टची बटणं खालीवर लावून!"

रजनी बोलत असताना सुधीर मान घाली घालून बसला होता—सारं शांतपणे ऐकून घेत. रजनी थांबल्यावर तो तिच्याकडे बघून म्हणाला,

"थँक्यू सो मच—हे सारं सांगितल्याबद्दल! कारण मला यातलं काहीही ठाऊक नाही. एकतर मी काम-धंद्यानिमित्त दिवसभर जवळजवळ बाहेरच असतो त्यामुळं त्याच्याकडे पुरेसं लक्ष पुरवता येत नाही मला—अन् त्यानंही आजवर माझ्याकडे याबाबत अवाक्षरानंही तक्रार केलेली नाही. दुसरं म्हणजे माझ्या घरात त्याच्यावर लक्ष ठेवायला मायेचं माणूसही कुणी नाही माझ्याखेरीज—"

"त्याची कल्पना आहे मला—म्हणजे दोन दिवसांपूर्वी त्याच्याशी बोलताना मिळाली—अन् म्हणूनच तुम्हाला बोलावून घेतलं. म्हटलं तुम्हाला कदाचित हे माहीत नसलं तर कळेल अन् ह्याच्यात काही सुधारणा करता आली तर फारच उत्तम! कारण तुमच्या भावाच्या बुद्धीचा पल्ला मी ओळखून आहे—त्याला पुरेसं उत्तेजन—संधि मिळाली तर तो चमकेल! मला वाटतं माझ्या बोलण्याचा आशय तुम्ही ओळखलाय्—तुम्हाला आपल्या भावाकरिता काही करता आलं तर त्यात त्याचं फार मोठं कल्याण आहे."

"बघतो मी. शक्यतो प्रयत्न करीन सुधारणा घडवून आणण्याचा! माझ्या माधववर असंच लक्ष ठेवा तुम्हीही! काही कमी-जास्त वाटलं तर मला तावडतोब कळवा, बरं, मग निघू मी आता?"

"हो!" म्हणून रजनीनं हसून निरोपादाखल हात जोडले अन् ती उठून उभी राहिली. प्रतिनमस्कार करून तोही उठला अन् "बरंय्!" म्हणून वळला. तो दाराशी जाईपर्यंत रजनी स्वतःशी घुटमळली अन् तो दार लोटून बाहेर पडणार एवढ्यात मनाशी पक्का निश्चय करून म्हणाली,

"मिस्टर मेहेंदळे—जस्ट अ मिनिट प्लीज—"

तो मागं वळला अन् प्रश्नार्थक मुद्रेनं म्हणाला,

"माफ करा,—मला म्हणालात काही?"

"अं हो—'त्या' दिवशी तुमची क्षमा मागायची संधि न देता आपण निघून गेलात—ती आज मागते! माझ्यामुळं आपल्याला फार मोठा मनस्ताप—"

"ओ आय सी!" तो क्षणभर चमकला पण लगेच दिलखुलासपणे हसून म्हणाला, "तुम्ही 'त्या' दिवसाचं म्हणताय होय! अहो, मी ते केव्हाच विसरून गेलोय्—मग क्षमा करायचा प्रश्न कुठं येतो?—अच्छा, येतो मी!" अन् एकवार मान झुकवून तो दार लोटून बाहेर





अनुक्रमणिका

पडला – रजनी त्याच्या मागोमाग बाहेर आली अन् त्याच्या पाठमोऱ्या रुबाबदार मूर्तीकडे पाहताना तिच्या मनात आलं –

"अन् ह्या एवढ्या सज्जन–व्यवस्थित तरुणाबद्दल आपण केवढा गैरसमज करून घेतला होता ! शी-शी ! ती आठवणही लज्जास्पद आहे !"

अन् तिच्या डोळ्यासमोर दोन महिन्यांपूर्वीचा तो प्रसंग उभा राहिला !

तो दिवस कसला तरी सुटीचा असल्यानं मैत्रिणींबरोबर ती दुपारच्या शोला एका चित्रपटाला गेली होती. शो सुटल्यावर ती अन् तिच्या मैत्रिणी बस-स्टॉपवर जाऊन उभ्या राहिल्या. तसं पाहिलं तर चित्रगृहापासून आपापल्या घरी चालत जाणं त्यांना अगदीच अशक्य नव्हतं –अन् त्यांनीही शो सुटल्यावर बोलत बोलत पायीच घरी जायचं ठरवलं होतं – परंतु शो सुटल्यावर त्या बाहेर येऊन बघतात तो आकाश ढगांनी अगदी भरून गेलं होतं – पाऊस आता कोसळेल का पुढल्या क्षणी याचा काही भरवंसा नव्हता अन् म्हणूनच त्या अखेर नाईलाजानं बसस्टॉपवर जाऊन उभ्या राहिल्या! पावसाच्या कारणानंच बसस्टॉपवर भलतीच गर्दी होती. एकेरी रांग नव्हतीच–तेर स्टॉपवर घोळकाच निर्माण झाला होता – एवढ्यात मोठा पाऊस आला अन् आणखीनच गोंधळ झाला ! त्या साऱ्या गोंधळात रजनी अन् तिच्या मैत्रिणी गप्पा मारता मारता बसची वाट पहात होत्या. बऱ्याच वेळानं पुढची रांग सरून त्यांचा नंबर जवळ आला. हा वेळपर्यंत रजनीचं लक्ष तिच्या बाजूच्या एका तरुणानं नाही म्हटलं तरी वेधून घेतलं होतं. त्याच्या सुदृढ देखण्या व्यक्तिमत्वाला त्याच्या अपटुडेट पोषाखानं एक वेगळाच रुबाब आला होता. त्यामुळं त्याच्याकडे कुणाचंही लक्ष जाणं साहजिकच होतं – अन् त्यातून तो रजनीच्या अगदी जवळच रांगेत उभा होता– त्यामुळं त्याचा विलक्षण देखणा चेहरा रजनीच्या पक्का लक्षात राहिला होता ! रजनी अन् तिच्या मैत्रिणी पहिल्या नंबरावर आल्या अन् बस आली. पाऊस अन् रांगेतला गोंधळ त्यामुळं त्यांचा पहिला नंबर असूनही बरेच लोक रांग मोडून घुसू लागले. त्या धक्काबुक्कीतून रजनी बसमध्ये चढत होती एवढ्यात तिला जाणवलं की आपल्या गळ्यातली साखळी ओढली जात असून ब्लाऊजला लावलेल्या पिनमुळं ह्या कृत्याला अडथळा होतोय् म्हणून ! त्यासरशी तिनं आपल्या मानेभोवती हात फिरवला अन् कुणाचा तरी हात तिच्या हातात सापडला – अन् तो घट्ट पकडून तिनं 'चोर-चोर' म्हणून आरोळी ठोकली –

हा सारा प्रकार केवळ निमिषार्धात घडला होता. रजनीच्या 'चोर-चोर' ह्या ओरडण्यानं चांगलंच काम केलं होतं. कारण बसमधली माणसंही भराभर खाली उतरली–काही क्षणातच ! तोपर्यंत रजनीच्या हातात जो हात सापडला होता त्यानं सुटायची जाम धडपड केली परंतु रजनीपुढं काही चालू शकलं नाही. गर्दीमुळं रजनीला तो माणूस कोण आहे ते मात्र दिसत नव्हतं – परंतु पुढल्या दोन-चार क्षणातच तिनं चोराचा हात पकडलाय् हे दिसताच मधले लोक आपसूक बाजू झाले अन् –

–अन् त्या रुबाबदार तरुणालाच आपण चोर म्हणून पकडल्याचं दिसताच रजनी क्षणभर चपापली; परंतु दुसऱ्याच क्षणी तिच्या आश्चर्याचं रूपांतर रागात झालं.

एव्हाना आपण सर्वांसमोर उघडे पडलेले पाहून रजनीच्या हाताला हिसडा मारून, रागानं लाल झालेला तो तरुण ओरडत होता –

"हा काय फाजिलपणा आहे – माझा हात कशाला धरून ठेवलाहात ?"

"म्हणे माझा हात कशाला धरून ठेवलाहात?" रजनीनं त्याला वेडावून, रागानं म्हटलं होतं, "चोर तो चोर अन् वर शिरजोर ! लाज नाही वाटत विचारायला ? प्रत्यक्ष मी साखळी ओढणारा तुमचा हात धरून ठेवला होता – साखळी आणा मुकाट्यानं !"

"मला काय माहीत तुमची साखळी मी थोडीच चोरलेय ?

त्याच्या त्या कांगाव्यानं रजनी हतबुद्ध झाली. आजुबाजूला भरपावसातही गर्दी वाढत होती. "पक्का भामटा दिसतोय बाई !"

"अहो–अलिकडचे बदमाष असेच असतात–पोषाखावरून कुणाला छाती नाही व्हायची संशय घ्यायची–ह्या चांगलं ठोकलं पाहिजे * * * – त्याशिवाय नाही वठणीवर यायचा !" म्हणून आजूबाजून शेऱ्यावर शेरे मारले जात होते. काही लोकांनी संधी साधून त्याला चारसहा गुद्दे मारायलाही कमी केलं नाही. एवढ्यात कुणीतरी पोक्त माणूस म्हणाला,

"बाई– तुम्ही सरळ पोलिस स्टेशनवर न्या त्याला ! रस्त्यावर तुमचीही शोभा नको ! – तिथं व्यवस्थित झडती घेतील !

"हो हो न्या की !" तो तरुण आवाज चढवून म्हणाला, "होऊन जाऊ दे झडती – अरे कर नाही त्याला डर कशाला !"

रजनीच्या मैत्रिणींनी "चांगली अद्दल घडवायला हवी पोलिसांकडून !" म्हणून साथ दिली – बाजूचे लोकही तसंच म्हणू लागले. तेवढ्यात कुणीतरी जाऊन एका हवालदाराला बोलावूनही आणलं अन् त्यानं त्या तरुणाला ताब्यात घेऊन सारी वरात पोलिस स्टेशनकडे चालवली. गोष्ट ह्या थराला आल्यावर रजनीलाही चमत्कारिक








वाटू लागलं – विशेषतः त्या तरुणाचा रागानं लाल झालेला चेहरा – कपाळावरच्या फुगलेल्या शिरा, ताठ वागणूक पाहून तिला क्षणभर वाटू लागलं की खरोखरच हा तरुण निरपराध तर नसेल ना! पण पुनः तिला त्याचा हातच आपण आपल्या गळ्याभोवती असलेला पकडल्याचं पक्कं स्मरत होतं – अन एवीतेवी तिची साखळी, जी तिच्या स्वर्गवासी आईची आठवण म्हणून ती गेली कित्येक वर्षे गळ्यात घालीत होती, गेलीच होती तेव्हा संशय फेडून घेतलेला बरा–म्हणजे मागून रुखरूख लागायला नको असंही वाटत होतं! या उलट-सुलट विचारात पोलिस-स्टेशन कधी आलं ते कळलंही नाही.

तिथं मग सगळे सोपस्कार झाले अन् शेवटी त्या तरुणाची पंचांसमक्ष झडतीही घेण्यात आली होती –

– अन् साखळी सापडली नाहीच! पोलीस इन्स्पेक्टरनं दिलगिरी व्यक्त करून त्याला जायची परवानगी दिली. रजनीला मेल्याहून मेलं झालं होतं – ती दिलगिरी व्यक्त करण्यासाठी कसंबसं तोंड उघडणार एवढ्यात आतापर्यंत शांतपणे सारे सोपस्कार करून घतलेला तो तरुण कडाडला होता,

"आता झालं ना तुमचं समाधान – चार चौघात माझी अब्रू धुळीला मिळवून?"

अन् शरमेनं रजनीची खाली झुकलेली मान वर व्हायच्या आतच तो ताडकन् पायऱ्या उतरून गेला होता – बाहेरच्या अंधारात अन् धूम पावसात दिसेनासा झाला होता – रजनी वेड्यासारखी कशीबशी आपल्या अपमानाचं ओझं वागवून खालमानेनं मैत्रिणींच्या आधारानं तिथून मग बाहेर पडली होती!

गेल्या दोन-अडीच महिन्यात तिला हा प्रसंग आठवताच ती चांगलीच अस्वस्थ व्हायची! त्या तरुणाची रागीट मुद्रा तिचा थरकाप उडवायची – त्यातून तिच्या आनंदभैय्याला तर तिची थट्टा करायला हा विषय अजूनही पुरला होता!

त्यामुळंच त्या तरुणाला आज माधवचा भाऊ म्हणून पहाताच तिला एवढं गोंधळायला झालं होतं की – !!! मात्र आता तो निघून गेल्यावर तिच्या मनावरलं कितीतरी दिवसाचं दडपण नाहीसं झालं होतं – रुखरूख गेली होती. सुधीर मेहेंदळेनं तो प्रसंगही आपण विसरल्याचं दिलखुलासपणे सांगून तिचा निरोप घेतला होता! –

घड्याळाच्या दोनच्या ठोक्यानं ती भानावर आली – अजून तिला घरी जाऊन जेवायचं होतं! पपा वाट पहात थांबले असतील या विचारानं ती घाईघाईनं उठली अन् आरशात डोकावून केस चाचपून सारखे करीत पर्स सावरून झपाट्यानं बाहेर पडली! आनंदी मनानं – हवेवर तरंगावी तशी –

परंतु मनाचा तो आनंद – खुपी तिला उणे-पुरे दोनच दिवस पुरली. सोमवारी संध्याकाळी शाळा सुटल्यावर ती घरी चालली असताना माधवनं धावत-धावत येऊन तिला थांबायला सांगितलं अन् पुस्तकांच्या बॅगेतून एका बॉक्स काढून तिच्या पुढं करीत तो म्हणाला,

"बाई ही घ्या! माझ्या सुधीरदादानं तुम्हाला द्यायला सांगीतलंय्!"

"काय आहे ह्या छोट्या पेटीत?" ती चकीत झाली.

"मला काय माहीत?" माधवनं खांदे उडवले. "उघडून न बघण्याबद्दल दादानं बजावल्यामुळं मी उघडूनही पाहिली नाही. घ्या लौकर" अन् रजनीनं ती बॉक्स घेतल्यावर धूम ठोकता ठोकता तो म्हणाला, "दादा म्हणाला होता की तुझ्या बाईंना ही बॉक्स दिल्यावर तिथं क्षणभरही उभं रहायचं नाही म्हणून!"

त्या 'बॉक्समधे काय असेल' म्हणून रजनी अगदी उत्कंठीत झाली होती तरी 'रस्त्यात ती उघडून पहाणं वरं दिसणार नाही' या विचारानं औत्सुक्याला आळा घालून तिनं ती बॉक्स आपल्या पर्समधे ठेवली अन् ती घराच्या दिशेनं चालू लागली. घरी आल्यावर आपल्या खोलीत शिरून तिनं प्रथम दार लोटून घेतलं अन् पर्समधून बॉक्स काढून हलकेच उघडली तो तिच्या नजरेस एक चिठ्ठी दिसली.

"तुम्हाला क्षमा करण्याचा अधिकार मला नाही – उलट मलाच तुमची मनःपूर्वक क्षमा मागायला हवी – सुधीर मेहेंदळे."

चिठी उलगडताच आतल्या वरील दोनच ओळी वाचून रजनीच्या मनात विचित्र शंका आली – अन् चिठी बाजूला टाकून त्याखाली असलेली पुडी तिनं घाईघाईनं उघडली मात्र –

तिचा स्वतःच्या डोळ्यावर विश्वास बसेना! क्षणापूर्वी मनात आलेली शंका खरी ठरल्याचं दृष्टीस पडताच सुन्न होऊन तिनं डोळे मिटून घेतले अन् कपाळाला हात लावून ती स्वस्थ बसली.

तिची चोरीला गेलेली ती साखळीच तिच्याकडे विनासायास परत आली होती – चोराच्या क्षमायाचनेसह – अन् तरीही रजनीला त्याबद्दल यत्किंचित्‌ही आनंद वाटत नव्हता. उलट सुधीर मेहेंदळेकडून परत आलेली 'ती' साखळी पाहून रजनीला एवढा धक्का बसला होता की कुणी हातापायातली शक्तीच काढून घ्यावी तसं होऊन ती आपल्या पलंगावर बसली होती. झाल्या प्रकाराचा सुसंगत अर्थ एवढाच निघत होता की सुधील मेहेंदळेनं तिची साखळी खरोखरच चोरली होती – अन् करून सवरून वर पुनः तिला हातोहात फसवलं होतं. अन् हाच विचार तिला अत्यंत क्लेशकारक होत होता. त्याच्या सारख्या तरुणानं 'असले धंदे' करावेत याचा तिला एकीकडे खेद वाटत होता – आश्चर्य वाटत होतं अन् चीडही येत होती! ह्या चोरीच्या बाबत दोन महिने आपणाला केवढा त्रास भोगावा लागला त्याची आठवण झाली की तिला जेवढा राग येई तेवढंच सुधीर मेहेंदळेच्या बडरपणाचं, हुकमी अस्सल अभिनयाचं कौतुक वाटल्याखेरीज रहात नसे!

अशा तऱ्हेच्या उलट-सुलट विचारात ती गुंगून बसली होती परंतु दारावरच्या टकटकीनं भानावर आली. तिनं दचकून एकवार दाराकडं पाहिलं अन् पटकन् ती साखळी उचलून पर्समधे टाकली. नंतर दार उघडून पाहिलं तो आनंदभैय्या म्हणाला,

"रजू, किती वेळ वाट पहायची तुझी? पपा नि मी केव्हाचे

अनुक्रमणिका








तुझ्यासाठी खोळंबून बसलो आहोत. शेवटी पपांनी खुद्द मला पहायला पाठवलं – का ग ? काय होतंय् ? चेहरा कां तुझा एवढा उतरलाय ?"

"अं–थोडसं डोकं दुखत होतं म्हणून जरा पडले होते तो डोळाच लागला असावासं वाटतंय् ! पण त्यामुळं डोकं थांबलंय् – तू जाऊन पपांना सांग की मी लगेच येतेच आहे कपडे बदलून !"

आनंद निघून जाताच रजनीनं सुटकेचा निश्वास टाकला परंतु लगेच तिच्या मनात आलं की तात्पुरता प्रसंग टळला. पण पुढं काय ? आज ना उद्या पपांना वा भैय्याला साखळी मिळाल्याचं कळणारच – तेव्हा त्यांना काय सांगायचं ? छे ! छे ! ! त्या मेल्या मेहेंदळचानं पुनः ही सांखळी परत करून नसत्या संकटात घातलंय् आपल्याला – चोरलीन् ती चोरलीन् अन् वर पुनः ही पीडा ! काय सांगायचं कुणी विचारलन् तर की साखळी कुठं मिळाली म्हणून ? खरं सांगायचं तरी पंचाईत – ! ! ! अन् हा आनंदभैय्या नेहमी आपल्या गैर-हजेरीत आपली खोली धुंडाळतो त्याच्यापासून ही साखळी लपणारेय थोडीच ! खरंच – त्याला जर कळलं की आपल्या वर्गातल्या मुलाच्या भावानं आपली साखळी चोरली होती म्हणून तर जीव नकोसा करील आपल्याला! अन् पपांपर्यंत गेलं तर बघायलाच नको–त्या मेहेंदळेची धडगतच नाही मग !

चिडचिडल्या मनानंच ती साडी बदलता बदलता साखळीबद्दल वरीलप्रमाणं विचार करीत होती. शेवटी थोड्या वेळानं एक निश्चय मनाशी केल्यावर तिचं मन शांत झालं. ती दार उघडून बाहेर आली अन् पपांच्या खोलीकडे निघाली.

* *

दुसऱ्या दिवशी शाळेत येताच तिनं माधवजवळ चौकशी केली तेव्हा तिला समजलं की सुधीर हल्ली संध्याकाळी बाहेर कुठं न जाता माधवला काम पडू नये म्हणून घरीच असतो. क्षणभर विचार करून मी माधवला म्हणाली,

"माधव, आज संध्याकाळी मी तुझ्या घरी येणारेय बरं का ? मला घर दाखवशील ना तुझं ? थोडं काम आहे तुझ्या दादाशी"–

"हो हो! दाखवीन की आमचं घर ! कधी, शाळा सुटल्यावर जायचं ?" बाई आपल्या घरी येणार या कल्पनेनंच हुरळून माधव उत्साहानं म्हणाला.

"हो, पण एक लक्षात ठेव – याबाबत कुठं बोलायचं नाही हं ! – अगदी तुझ्या मित्रांजवळही. नाहीतर मी येणार नाही बघ. जा तर मग आता !"

शाळा सुटल्यावर ठरल्याप्रमाणं माधव तिला आपल्या घरी घेऊन गेला. तसल्या प्रकारच्या खालच्या वर्गाच्या लोकांच्या विभागात ती प्रथमच पाऊल ठेवीत होती. पावलापावलावर तिथल्या दैन्य-दारिद्र्याचं अन् अस्वच्छतेचं जे दर्शन तिला घडत होतं त्यानं तिचं मन अक्षरशः हेलावत होतं. माधवच्या मागोमाग अनेक गल्ल्या बोळ पार करीत ती शेवटी एका जुनाट दुमजली बिल्डिंगसमोर येऊन उभी राहिली. तिला थांबायची खूण करून माधव पुढं झाला अन् त्यानं एका बंद दारावर थाप मारीत 'दादा–दाऽदा !' म्हणून हाका मारल्या.

दोन-चार क्षणांनी दार उघडलं गेलं अन् दारात उभ्या सुधीरचा अवतार रजनीच्या दृष्टीस पडला. त्याचा एक हात कणकेनं भरलेला होता – त्यानं हाफपँट घातली होती अन् त्याच्या सर्वांगातून घामाच्या धारा वहात होत्या. त्यात पुनः चेहऱ्यावर अन् उघड्या शरीरावरही ठिकठिकाणी कोळशाचे काळे नि कणकेचे पांढरे डाग पडले होते. त्याचक्षणी माधवनं आपल्या मागं उभ्या असलेल्या रजनीकडे बोट करून 'कोण आल्यायत् बघ म्हणून म्हटलं अन् सुधीरचं तिच्याकडे लक्ष गेलं. नजरानजर होताच त्याचा चेहरा खरंकन् उतरला – त्यातच आपल्या अवताराबद्दल संकोचाची त्यात भर पडली. तरीही चेहऱ्यावर उसनं हसू आणीत तो मागं होत म्हणाला,

"ओहो – आपटेबाई, या ना !" अन् "बसा–मी आलोच" म्हणत तो घाईघाईनं मधल्या दारानं आतल्या खोलीत पळाला.

रजनी माधवच्या मागोमाग आत शिरली अन् त्यानं पुढं केलेल्या खुर्चीवर बसली. खोली विशेष मोठी नव्हती अन् आत अंधारही बराच होता. एवढ्यात माधवनं दिवा लावला अन् खोलीचं नीटनेटकं स्वरूप उजळून रजनीच्या डोळ्यात भरलं.

"माधवला तुमच्या सांगण्याप्रमाणं अभ्यासाला वेळ मिळावा म्हणून स्वतः पाकसिद्धी चालवली होती –" या शब्दांमागोमाग सुधीर पुन: बाहेर आला तेव्हा त्यानं तोंड धुवून टाकलं होतं – लेंगा चढवून वर स्वच्छसा शर्ट परिधान केला होता. त्याच्या खुलाशानं मगाचच्या त्याच्या अवताराची आठवण होऊन रजनी हसून म्हणाली.

"पाकसिद्धीची तपश्चर्या तुम्हाला फारच अवघड जातेयसं दिसतंय्!"

"अं–हो! कारण गेली दोन-तीन वर्षे माधव सारं सांभाळीत असल्यानं माझी सवय मोडली म्हणून कबूल करायला काय हरकत असावी? बरं – चहा बाहेर आणू की तुम्ही आत येता – आतली खोलीही बघून होईल!"

चहा घेता घेता रजनीच्या सूक्ष्म नजरेनं स्वयंपाक घरातील स्वच्छता नि नीटनेटकेपणा टिपली. सारी भांडी कशी चकचकीत होती – एखाद्या कुशल सुगृहिणीचा हात रोज फिरत असावा तशी. तिच्या नजरेतील कौतुकाचा अभिप्राय ओळखून सुधीर स्मितपूर्वक म्हणाला,

"आपल्या शिष्याचीच सारी करामत आहे बरं का ही, आपटेबाई! त्याला स्वच्छतेची आवड आहे फार. तुम्ही आता जायची खोटी की मला रागवायला सुरवात करील की इथं खराब केलंस तिथं डाग पाडलेस म्हणून!"

अन् त्यावर माधव ओशाळलेला पाहून रजनीला हसू आवरेना. चहा झाल्यावर ती तिथं बाहेर आली. सुधीर माधवला म्हणाला,

"माधव – अरे, मी आहे इथं आता! तुला खेळायला कुठं मैदानावर जायचं असलं तर जा! मगाशी तुझे दोस्त आलेच होते विचारायला की माधव अजून शाळेतून आला नाही का म्हणून. त्यांनी तुला मैदानावर बोलावलंय् खेळायला—"

पडत्या फळाची आज्ञा घेऊन माधव धावत सुटला. तो दृष्टीआड होईतो सुधीर दारात उभा होता–अन् तो वळताक्षणीच रजनीच्या लक्षात आलं की त्याचा चेहरा विलक्षण गंभीर झालाय् म्हणून. तिच्याकडे न बघता, खालमानेनंच तो चार पावलं पुढं आला अन् म्हणाला –

"तुम्ही ती साखळी परत करायला आला असाल ना?"

"हूं!" रजनीनं जोरानं रुकार दिला अन् मग पर्स उघडून तिनं ती साखळी बाहेर काढली. साखळी हातात घेऊन तिनं वर पाहिलं तो सुधीर तिच्याकडेच पहात होता. त्याच्या निश्चल नजरेला नजर देऊन ती काहीतरी म्हणणार एवढ्यात तोच म्हणाला,

"अन् मी ती साखळी घेतली नाही तर?"

त्याच्या त्या अनपेक्षित शब्दांनी रजनी क्षणभर हादरलीच; परंतु जेव्हा त्या शब्दांचा अर्थ तिच्या मनाला समजला तेव्हा तिचा सारा क्रोध-मनस्ताप – चीड उफाळून बाहेर आली अन् ती त्वेषानं म्हणाली,

"कां म्हणून घेणार नाही? – एवढी नको होती तर मग त्या दिवशी स्वतःची भररस्त्यात शोभा कशाला करून घेतलीत! तेव्हाच कां परत दिली नाही?"

"तेव्हा चोरली होती ती गरजेसाठी – पोटासाठी!" त्याच्या शांत शब्दांवर तिनं हेटाळणीच्या स्वरात विचारलं,

"मग ते पोट आता कुठं गेलं?"

"पोट कुणाला चुकलंय्, बाई? पण केवळ पोटाच्या गरजेसाठी म्हणून माधवच्या बाईंच्या गळ्यातली साखळी मात्र मी कधीही उपयोगात आणणार नाही!" सुधीरच्या आवाजाला वेगळीच धार आली होती, "जेव्हा तुमची साखळी चोरली तेव्हा मी सराईत गुन्हेगार होतो अन् तुम्ही होता माझ्या दृष्टीनं एक सावज – श्रीमंत सावज! परंतु परवाच्या दिवशी मला समजलं की माधवच्या तुम्ही वर्गशिक्षिका आहात म्हणून – अन् त्या क्षणापास्नं माझं मन मला खाऊ लागलं! बाई, माझ्या आईची शिकवण होती की प्रत्यक्ष परमेश्वराहून माता-पिता अन् त्यांच्याहूनही गुरू श्रेष्ठ अन् वंदनीय! अन् अशी महती असलेल्या प्रत्यक्ष माझ्या धाकट्या भावाच्या गुरूची साखळी चोरण्याचा – अजाणतेपणी का होईना – अपराध माझ्याकडून घडला ही जाणीव मला चैन पडू देईना! शेवटी माझ्या अंतर्मनाची टोचणी मला एवढी असह्य झाली की ती साखळी तावडतोब तुमच्याकडे परत पाठवायचा निर्णय मी घेतला. अन् तो निर्णय अमलात आणल्यावरच मला माझं हरपलेलं स्वास्थ्य फिरून प्राप्त झालं."

"हा एवढा प्रामाणिकपणा, तुम्ही जगात इतरांशी वागताना कुठं विसरून जाता?" तो गप्प झाल्यावर रजनीनं खोचून विचारलं. तिच्या मनाची रुखरुख अजून गेली नव्हती.

" – जगही तेवढंच अप्रामाणिक आहे म्हणून!" जहरी स्वरानं, तिरस्काराच्या मुद्रेनं सुधीर उद्गारला, "मला प्रामाणिकपणे वागायची संधी जगानं दिलीच नाही तिथं मी काय करणार! प्रामाणिक माणसांशी मी नेहमीच प्रामाणिकपणे वागतो! माधवच्या शिक्षिका ही एक बाब अन् दुसरं म्हणजे त्याच्याबद्दल आपुलकीनं सूचना करून तुम्ही जो चांगुलपणा दाखवलात त्यामुळं माझ्या मनात तुमच्याशी प्रामाणिकपणे वागायची इच्छा निर्माण झाली! नाहीतर तुम्हीच सांगा – तुमच्या दृष्टीनं या चोरीच्या प्रकरणात मी निर्दोष ठरलो होतोच – ज्याअर्थी तुम्ही माझी क्षमा मागायलाही तयार झालात त्यावरून मी हे खात्रीनं म्हणतोय्! पुन: तुम्ही माझ्या भावाच्या शिक्षिका – अशा परिस्थितीत तुमचा माझ्याविषयीचा चांगला ग्रह ती साखळी – जी तुमच्या दृष्टीनं मी चोरलेली नव्हतीच! – मुद्दाम परत करून नाहीसा करण्यात माझा काय फायदा होता? उलट एका भामट्याचा – ढोंगी बदमाषाचा भाऊ म्हणून माधवही तुमच्या नजरेतून उतरण्याचा दाट धोका होता – आहेही – असं असताना मी तुमची साखळी कशाला परत केली असती? ह्याचं








उत्तर एकच – की माझ्या सद्सद्विवेकबुद्धीनं मला तसं करण्यास भाग पाडलं – मग तुम्हाला पटो वा न पटो ! ! ! —"

त्याचं बोलणं रजनीला निरुत्तर करणारं होतं ! काय खोटं होतं त्याच्या म्हणण्यात ? अन् तेच न समजल्यानं तिची मान आपोआपच खाली गेली – त्याच्या चेहऱ्याकडे पाहण्याचं वा आत्मविश्वासपूर्ण नजरेला नजर देण्याचं धैर्य तिला झालं नाही ! खरं म्हणजे तिच्या मनात त्याला कितीतरी सुनवायचं होतं – चांगली खरडपट्टी काढायची होती. पण त्याच्या स्पष्ट,उघड अन् प्रामाणिक कबुलीजवाबानं तिचे सारे बेत ढासळून पडले अन तिनं मान खाली घातली. परंतु सुधीरचं त्यावर समाधान झालं नव्हतं. मगाशी तिनं विचारलेले कुत्सित प्रश्न त्यालाही झोंबले नव्हतेसे नाहीत. त्यामुळं दोन चार मिनिटं त्यानं ती काहीतरी बोलेल म्हणून वाट पाहिली अन् मग तो किंचित् स्मितपूर्वक म्हणाला, "अहो आपटेबाई, . "

त्या हाकेसरशी रजनीनं दचकून सुधीरकडे पाहिलं अन् त्याच्या चेहऱ्यावरलं प्रसन्न हास्य पाहून ती अधिकच गोंधळली. तिच्या गोंधळाची मौज पाहून सुधीरनं खेळकर स्वरात म्हटलं,

"मगाशी तुम्हाला मी म्हटलं होतं की जग अप्रामाणिक आहे म्हणून ! तुम्हालाही मी अप्रामाणिक म्हणू शकतो – खरं सांगा, तुम्ही ही साखळी परत करायला कां आलात ? तर तुम्हाला वाटलं असावं की कुणी साखळी कुठं मिळाली म्हणून विचारलं तर सांगायचं कसं की माझ्या वर्गातल्या एका मुलाच्या भावानं ती चोरली होती खरी – पण परत केलीन् मागाहून म्हणून ! होय की नाही ? या उलट पोलिसांकरवी जर ही साखळी तुम्हाला परत मिळती तर "पोलिसांनी दिली बाई परत मिळवून !" म्हणून तुम्ही ती गळयात घालून मिरवली असती की नाही ? मग तुम्हाला आता प्रामाणिकपणे सत्य कां स्वीकारता येत नाही ?"

आपण बरोबर शब्दात पकडले गेलो या विचारानं रजनीला हसूच फुटलं. ती तोंडावर तर्जनी ठेवीत म्हणाली,

"समजला तुमचा आशय ! हे कबूल करण्यात तरी मी अप्रामाणिकपणा करीत नाही ना ?"

"नाही नाही ! तुम्ही कबूल केलंत. त्यात सर्व आलं. माझा म्हणण्याचा अर्थ होता एवढाच की जगात प्रत्येकाला प्रामाणिकपणे नेहमीच वागता येत नाही. अर्थात् प्रत्येकाच्या परिस्थितीनुसार कमी-अधिक अप्रामाणिक व्हावं लागतं ! मग काय ? तुम्ही तरी ती साखळी धैर्यानं गळयात घालून प्रामाणिक बनणार काय ?"

त्याच्या डोळयात आव्हान होतं – हसण्यात उपहास होता. रजनीनं क्षणभरच विचार केला अन् हातातल्या साखळीचा फासा काढून गळयात अडकवीत ती म्हणाली,

"मिळालं तुमच्या प्रश्नाचं उत्तर ? माझंही ज्या कामासाठी आले होते ते काम झालं – मी निघते आता !" अन् ती उठून उभी राहिली.

"तुम्हाला बसस्टॉपपर्यंत जाता येईल का एकटयानं ! एकतर काळोख झालाय् – अन् दुसरं म्हणजे तुम्ही या भागात कधी आला नसाल ! तुमची हरकत नसेल तर मी तुम्हाला स्टॉपपर्यंत पोहोचवतो !"

"थँक्यू सो मच फॉर युवर ऑफर !"

"नो मेंशन ! चला तर मग !"

त्याच्याबरोबर हसत बोलत चालताना तिला स्टॉप कधी आला ते कळलंही नाही. सुधीर संभाषणचतुर होता त्यामुळं मगाचच्या घटनांचा पुसट मागमूसही न ठेवता त्यानं रजनीला सर्वंध रस्ताभर अन् स्टॉपवरही हसतं-बोलतं ठेवलं होतं. शेवटी रजनीला हवी ती बस आल्यावर तिनं त्याचा निरोप घेतला. उल्हसित मनानं ती एका रिकाम्या सीटवर जाऊन बसणार एवढ्यात 'रजू' म्हणून हलक्या आवाजातली हाक तिच्या कानांवर आली. तिनं पाहिलं तो आनंद-भैय्यानं तिला हाक मारली होती. ती चकीत होऊन त्याच्या बाजूला बसता बसता म्हणाली,

" तू कुठं गेला होतास या बाजूला आत्ता, भैय्या ?"

"तुझ्यासारखाच – भटकायला ! !" त्याच्या तीव्र स्वरातलं जहर रजनीला जाणवलं. ती एकदम गप्प झाली. तिला वाटलं की खिडकीत बसल्यानं त्यानं बहुधा आपल्याला अन् सुधीरला पाहिलं असावं – अन् म्हणून तो असं खोचून बोलतोय म्हणून ! मागाहून सारा वेळ ती मग गप्पच होती – मात्र एकदोनदा तिचं लक्ष आनंद-भैय्याकडे गेलं अन् तिला जाणवलं की तो आश्चर्यानं आपल्या गळया-



अनुक्रमणिका

कडे बघतोय म्हणून. अन् या जाणीवेनं तिचा आतापर्यंतचा सारा उल्हास मावळला– आत्मविश्वास डळमळला अन् 'काय वारा आहे बाई!' म्हणत तिनं पदर गळ्याभोवताली घट्ट वेढून घेतला. परंतु एवढं करूनही विचार मात्र तिचा पिच्छा सोडीनात!

जी गोष्ट पपांपर्यंत जाऊ नये असं तिला मनापास्नं वाटत होतं ती आता अटळ होती अन् त्याचे परिणामही तिला स्पष्ट दिसत होते. पपांना कळताच त्यांनी खात्रीनं पोलिसात कळवलं असतं अन् मग सुधीरला – बाप रे! गुन्हेगाराला शासन व्हायला हवं हे रजनीला मान्य असलं तरी सुधीरबाबत तिचं मन पक्षपात करीत होतं – जाणता अजाणता! त्याहूनही दुसरी भीती तिला वाटत होती ती ही की या घटनेवरून पपा कदाचित ही नोकरीच सोडायला फर्मावतील म्हणून! एम्.ए. पास झाल्यावर घरी नुस्तंच बसून काय करायचं या विचारानं रजनीनं सहा महिन्यांपूर्वी 'श्री शारदा विद्यालयातील' शिक्षिकेची नोकरी स्वीकारली होती खरी, परंतु गेल्या सहा महिन्यात शाळेच्या अन् त्यातल्या विद्यार्थ्यांच्या विश्वात ती एवढी रमली होती की नोकरी सोडणं तिला जिवावरचंच होणार होतं. परंतु हे सारं सत्य पपांच्या समोर मान वर करून वा त्यांच्या डोळ्याला डोळा भिडवून सांगायचं सामर्थ्य आपल्यात नसल्याचं तिलाही माहीत होतं! लहानपणीच तिची आई गेल्यापासून पपांनी तिचे खूप लाड केले होते; परंतु तरीही लहानपणापास्नं तिच्या मनात पपांबद्दल एक प्रकारची जरबच होती. तिनं आपणहून त्यांच्याकडे कधी काही मागितलेलं नव्हतं – कारण तशी वेळच आली नव्हती अन् त्यांनी सांगितल्याबाहेरही ती आजवर गेलेली नव्हती. त्यामुळंच पपांचा आपल्याबाबतचा स्वभाव कसा आहे हे तिला आजमावताही आलं नव्हतं! 'आज थोडीशी झलक दिसेल' या विचारानं ती दचकली अन् हे सारं टाळण्यासाठी काहीतरी तिसराच मार्ग शोधून काढण्यात गुंग होऊन गेली!

घरी येईपर्यंत तिनं शांत मनानं सारं ठरवून ठेवलं होतं. घरी आल्याबरोबर आपल्या खोलीत शिरून तिनं कपाटातल्या सेफमध्ये साखळीची पुडी करून एका कोपऱ्यात टाकून दिली अन् 'जेव्हा कळेल मागाहून तेव्हा कळेल!' म्हणून शांत चित्तानं ती कपडे बदलू लागली.

जेवण तयारच होतं त्यामुळं पपांची डायनिंग टेबलावरच थोड्याच वेळात गाठ पडली अन् त्यांनीही अपेक्षेप्रमाणं अर्ध्या जेवणावर विचारलं,

"बेटा, तुझी साखळी मिळाली वाटतं?"

"नाही बाई! कां? तुम्हाला कोण म्हणालं?" आनंदकडं दुर्लक्ष करीत रजनीनं आश्चर्य दाखवलं.

"नाही, मगाशी हा आनंद म्हणत होता की बसमधनं येताना त्यानं तुझ्या गळ्यात पाहिलीन् म्हणून!"

"भैय्याची नजर बहुधा ठिकाणावर नसावी पपा – क्लबमधे गेला होता ना!" रजनीचा – कधीही उलट न बोलणाऱ्या रजनीचा टोला – आनंदला चांगलाच जाणवला. तो त्वेषानं म्हणाला –

"पपा – ही खोटं बोलतेय् साफ! मी मगाशी माझ्या डोळ्यानी हिच्या गळ्यात ती साखळी पाहिलेय् – विचारा तिला चांगलं हडसून-खडसून की –"

"पपा! रजनी पपांकडे पाहून मधेच म्हणाली, "भैय्याला म्हणावं माझ्या बाबतीत लुडबूड करू नको म्हणून! त्याच्या एवढ्या सतराशे-साठ भानगडी आहेत त्याबाबत मी चकार शब्द तरी कधी काढलाय् का? मग हा माझ्यावर उगाच खोटेनाटे आरोप कां म्हणून करतो? साखळीबाबत खोटं बोलून मला काय कुणाकडून डबोलं उकळायचंय् ह्याच्यासारखं का फसवणूक करायच्येय् लांडी-लबाडी करून?"

आपल्या मुलीच्या ह्या नव्या-तेजस्वी रूपाकडे पपा क्षणभर आश्चर्यानं कौतुकानं पहात राहिले अन् मग तिला हातानं थांबायची खूण करीत म्हणाले,

"म्हणजे तुझी साखळी मिळाली नाही तर! जाऊ दे – तू तुझ्या भैय्याच्या बोलण्याकडं दुर्लक्ष कर! अन् आनंद – तुलाही सांगून ठेवतोय् की रजनीच्या साखळीचा विषय पुनः माझ्यासमोर येता कामा नये! काय?"

अर्ध्या जेवणावरच समाधानानं – आनंदानं रजनीचं पोट भरलं अन् ती चटकन् उठून बेसिनकडे हात धुवायला धावली.

* *

बऱ्याच वेळानं दृष्टीस पडणाऱ्या टॅक्सी-वरचा For Hire चा उलटा केलेला बोर्ड पाहून रजनीची पुनः एकवार तीव्र निराशा झाली अन् कपाळा-मानेवरचा घाम रुमालानं टिपीत पुनः दूरवर दुसरी टॅक्सी दिसते का न्याहाळू लागली. एवढ्यात...

"हॅलो आपटेबाई – टॅक्सीचीच वाट पहाताय् ना? चला तर मग, आपली टॅक्सी उभी आहे –" या शब्दांनी चमकून तिनं पाहिलं तर हाताभराच्या अंतरावर सुधीर उभा होता. त्याला पहाताच ती हर्षून उद्गारली,

"कसे देवासारखे भेटलात अगदी! अहो अर्धा तास या तळपत्या उन्हात उभी राहून टॅक्सी बघतेय् मी पण!

"तुम्हाला आता जाताना पाहिलं म्हणून ड्रायव्हरला टॅक्सी पुढं उभी करायला सांगून मागं आलो – चलताय् ना मग?"

रजनीला त्यानं मागच्या सीटचं दार उघडून दिलं; परंतु तिच्या अपेक्षेप्रमाणं तिच्याजवळ न बसता तो मात्र ड्रायव्हरच्या बाजूला बसला. टॅक्सी सुरू झाल्यावर त्यानं विचारलं,

"पण तुम्ही इकडे कुठं आता? आज शाळेला सुटी आहे वाटतं?"

"छे हो! सुटी नाही, काही नाही! मलाच हौस मोठी म्हणून या भानगडीत पडले. दोन-तीन महिन्यांनी आमच्या शाळेचं वार्षिक संमेलन आहे – पंचवीसावं वर्ष म्हणून स्नेहसंमेलन मोठ्या प्रमाणात करा-यचंय् त्यामुळं आतापासूनच तयारीला लागलो आहोत आम्ही. मीच गंमतीनं

सूचना मांडली की सिनेतारका आपल्या शाळेच्या माजी विद्यार्थिनी आहेत तेव्हा त्यांनाच समारंभाच्या खास पाहुण्या म्हणून बोलवावं – तेवढंच आकर्षण ! सगळ्यांना सूचना आवडलीही अन् त्यामागोमाग ह्याबाबतची जबाबदारीही माझ्याच गळयात आली. मीही उत्साहानं बाईंच्या सेक्रेटरीला फोन करून आजची वेळ ठरवली अन् त्यानं दिलेल्या साडेबाराच्या आडनिड्या वेळेलाही हजर झाले त्यांच्या इथल्या बंगल्यावर ! अन् आयत्या वेळी बघते तो काय 'बाईसाहेब कुठल्यातरी अर्जंट कामासाठी बाहेर गेल्याहेत अन् रात्री परत येणारेत एकदम' म्हणून सेक्रेटरीनं मख्खपणं सांगितलं ! स्वत:वरच चरफडत बाहेर पडले अन् साऱ्या कटकटीच्या भरीस भर म्हणून चप्पलचा पट्टा तुटला ! वरं ह्या रस्त्यावर बसचा स्टॉप नाही की जवळ रेल्वे स्टेशन नाही – अन् चालायचं म्हटलं तर चपलेनं दगा दिलेला ! मग काय दैवाला दोष देऊन टॅक्सीची वाट पाहू लागले. पण मुळातच ह्या रोडला वाहतूक कमी – अन् ह्यावेळी कुठली टॅक्सी रिकामी मिळायला ! शेवटी अर्ध्या तासानं तुम्ही भेटलात तेव्हा असा आनंद झाला सांगू !"

रजनीनं सुटकेचा निश्वास टाकल्यावर सुधीर हसून म्हणाला,

"मग आता तुम्ही शाळेतच जाणार ना ? – म्हणजे काय, टॅक्सी तिकडून घ्यायला सांगतो – !"

"नको, नको !" रजनी घाईघाईनं म्हणाली, "निष्कारण तुम्हाला काय त्रास द्यायचा ! तुम्ही मला हमरस्त्यापर्यंत वा नजिकच्या रेल्वे स्टेशनला नेऊन उतरवलंत तरी पुष्कळ झालं ! तुमचा वेळ नको मोडायला – हो खरं, तुम्ही कुठं आता इकडे ? मगाचपास्नं विचारीनसं म्हणत होते !"

"खरं सांगू ? अहो हा आमच्या धंद्याचा टाइम !"

"म्हणजे ?" रजनीनं गोंधळून विचारलं. तिच्याकडे वळून पहात, आंगठा ओठाला लावून सुधीर म्हणाला,

"कळलं का आता तरी ? आणखीही अशाच मूल्यवान् वस्तू आहेत या टॅक्सीत !"

रजनीच्या डोक्यात आता मात्र लखकन् प्रकाश पडला अन् त्याबरोबर तिला भीतीनं – आश्चर्यानं गारठल्यासारखं झालं ! क्षणार्धात् सारा प्रकार तिच्या लक्षात आला अन् तिच्या डोळ्यांपुढनं शेकडो मथळे चित्रपटातल्या टायटल्ससारखे झळकून गेले. 'टॅक्सीत चोरटी परदेशी दारू पकडली' 'पोलीसांनी कौशल्याने हस्तगत केलेलं * * * लाखाचं चोरटं सोनं" घडयाळाचा बेकायदा साठा जप्त – 'एक ना दोन ! तिच्या पायगती असलेल्या छोटया मोठ्या पुडक्यांचा अर्थ तिच्या पुरेपूर ध्यानात आला अन् परिस्थितीच्या भयानकतेची कल्पना येऊन तिला घाम फुटला ! आपल्या अवस्थेकडे अन् बदलत्या चेहऱ्याकडे सुधीर लक्षपूर्वक, अस्वस्थपणे पहातोय् हे तिच्या गावीही नव्हतं – हादरल्या मनानं अन् थरथरत्या शरीरानं ती उद्याच्या पेपरात या मथळ्यांचा विचार करीत होती – "चोरटया आयातीच्या प्रकरणी एका स्त्रीस अटक" "सुशिक्षित तरूणींचे धोकेबाज उद्योग" अन् आता पोलिस ही टॅक्सी अडविणार की पुढल्या क्षणी म्हणून जीव मुठीत घेऊन ती बसली होती !

फरंटसीटवर तिनं घट्ट धरून ठेवलेल्या कापत्या हातावर तिला धीर देण्यासाठी हात ठेवत सुधीर हलकेच म्हणाला,

"मिस् आपटे – तुम्हाला माझ्याबरोबर टॅक्सीत बसल्याचा पश्चात्ताप होतोय ना ? घाबरू नका बिलकुल –"

रजनीनं त्या शब्दामुळं आपल्या विचारातून भानावर येऊन पाहिलं तो सुधीर शांत चेहऱ्यानं, आत्मविश्वासपूर्वक स्वरात म्हणत होता,

"तुमच्या मनातल्या शंका-कुशंका मी जाणतोय् ! पण तुमच्या सुरक्षिततेची खात्री बाळगा, हा टॅक्सी ड्रायव्हर आमचा नेहमीचाच आहे अन् पोलिस तर त्याहूनही आमचे आहेत. ह्या टॅक्सीला रोकण्याची हिंमत नाही त्यांची ! तुम्ही एवढ्या नव्हंस् व्हालशी कल्पना नव्हती मला ! I am very sorry – तुम्हाला झालेल्या मनस्तापाची मी क्षमा मागतो ! आता दहा मिनिटात तुम्हाला दादरला सोडतो – be sure !"

अन् दहा मिनिटानी दादर टी.टी.ला उतरताच रजनीनं अक्षरश: सुटकेचा निश्वास टाकला अन् सुधीरचे मुद्दामच साधे आभारही न मानता ती टॅक्सीपास्नं दूर झाली ती मनाशी निश्चयानं खणगाठ बांधीतच की.

"ह्या माणसापास्नं अगदी प्रयत्नपूर्वक दूर रहायला हवं ! अशा प्रकारचे धंदे असलेल्या तरुणापास्नं – मग तो कितीही लाघवी असो, इतर बाबतीत सभ्य असो – काही झालं तरी संभाळूनच रहायला हवं !"

* *



पण आठ दिवस मनाशी हा निश्चय रोज घोकूनही आयत्या वेळी मात्र तिला त्याप्रमाणं वागणं जमलं नाही. आठ दहा दिवसांनी शाळा सुटल्यावर घरी येताना अर्ध्या रस्त्यावरच तिला सुधीर दिसला. तिनं त्याला चुकविण्याचा प्रयत्न केला परंतु त्यानं स्कूटर एकीकडे सहजपणाचा आव आणीत तिच्यापुढं आणली की तिला थांबावंच लागलं. मिस्किलपणे हसत तो म्हणाला,

"अगदी नाकासमोर बघत घाईघाईनंशा जाताहात? उशीर झालाय् की काय?"

"अं-हो-!" ती त्यानं दिलेल्या सबबीचा फायदा घेत म्हणाली, "आज थांबावं लागलं थोडा वेळ – अन् थोडासा उशीर झाला की बसस्टॉपवरही एवढी लाईन वाढते –"

"चला तर मग तुम्हाला लौकर पोहोचवतो – बसा स्कूटरवर!"

क्षणभर तिला वाटलं की ह्याला सरळ नाही म्हणून सांगावं! तिनं प्रयत्नही केला परंतु ओठानी शब्द अडकवून ठेवले – डोळे तर नजरबंदी झालेच होते! तिच्या घुटमळण्यातून होकार गृहीत धरून तो हलकेच म्हणाला,

"बसा लौकर माझ्यामागं – लोक बघा कसे बघताहेत तुमच्याकडे ते!"

अन् दुसऱ्याच क्षणी स्मित करीत रजनी त्याच्या पाठीमागं स्कूटरवर स्वार झाली! स्कूटरवर ती बसलीच नव्हती कधी आजवर – उलट स्कूटरवर बसून जाणाऱ्या एखाद्या जोडप्याला पाहून तिला वाटायचं की काय मजा येत असेल नाही असं स्कूटरवर बसून एकदम फास्ट स्कूटर सोडल्यावर – अन् ती मजा तिला अनुभवायला मिळत होती!



"तुम्ही कधी बसलाहात स्कूटरवर यापूर्वी?"

"अंहं! आजच पहिल्यांदा बसतेय् – मजा येतेय् हं!"

"मग हरकत नाही! भीती खरंच वाटत नाही ना – म्हणजे पडायला होईल वगैरे म्हणून? मग थोडासा स्पीड वाढवू आणखीन्?"

"खुशाल!" म्हणून रजनी हसू लागली – परंतु दोन-चार क्षणातच स्कूटरचा स्पीड पाहून तिला खरोखरच भीती वाटू लागली अन् त्या भरात एका हातानं पर्स संभाळून दुसऱ्या हातानं तिनं सुधीरच्या दंडाला कधी धरलं तिचं तिलाच कळलं नाही! अन् ते कळलं तेही स्कूटर अचानक थांबल्यावर! एकदम गोंधळून तिनं त्याचा दंड सोडला अन् ती लाजून–खाली मान घालून बसून राहिली –

"इथली कॉफी छान असते बरं का – अगदी स्पेशल! बघा तुम्हाला कितपत आवडते –"

त्याच्या शब्दांनी तिनं एकदम वर पाहिलं तर खरंच ती दोघं एका कॅफेसमोर उभी होती.

"म्हणजे? आता कॉफी? – छे! छे!! उशीर होईल!"

तिच्यापुढं आपलं घड्याळ धरीत सुधीरनं विचारलं,

"रोज तुम्ही सातला पोहोचता ना घरी? मग आता सव्वासहा होताहेत – कॉफी पिताना अर्धा तास जरी गेला तरी दहा मिनिटात तुम्हाला घरी पोहोचवीन!"

अन् घरी येईस्तो रजनीला वाजून मात्र गेले आठ!

अन् तरीही पुन: पुढच्या वेळेस ती स्वत:ला रोखू शकली नाही! मैत्रिणींबरोबर एका सुटीच्या दिवशी ती खरेदी करायला जात होती तेव्हा तिला सुधीर भेटला. तिच्या मैत्रिणींचा घोळका पाहून तो केवळ तिलाच कळेलसं स्मित करून सटकण्याच्या बेतात होता – परंतु रजनीची पावलं आपोआपच थबकली अन् मग त्याचीही! पाच मिनिटांनी तो जेव्हा 'अच्छा. गुड नाईट' म्हणून गेला तेव्हा रजनीनं भानावर येऊन पाहिलं तो साऱ्या मैत्रिणी चकीत अन् मिस्किल चेहऱ्यांनी तिच्यावर प्रश्नांचा भडिमार करायच्या तयारीत होत्या.

"अय्या रजन्, तोच ना ग हा–ज्याला आपण गैरसमजानं चौकीवर नेलं होतं?"

"संभाळ ग बाई! साखळी चोरल्याचा आरोप तुला चारचौघात करता तरी आला. परंतु हृदय चोरीला गेलं तर कुणाजवळ तक्रार करशील?" अशा प्रकारच्या सूचक शेऱ्यांनी अन् थट्टेनं रजनी त्या संध्याकाळी अक्षरश: बेजार होऊन गेली–आपला मूर्खपणा तिच्या ध्यानात आला पण फार उशीरा!

अशा प्रकारांची पुनरावृत्तीही होऊ लागली! तो कधी कुठं भेटला तर बोलायला उभं राहिलं की दहा-दहा मिनिटं सहज जाऊ लागली. एकदा ती मैत्रिणींबरोबर पिक्चरला गेली अन् 'हाऊस फुल'चा बोर्ड पाहून – काळाबाजारवाल्यांच्या दराचा धसका घेऊन त्या परत फिरणार एवढ्यात सुधीरनं अचानक टपकून त्यांना तिकिटं दिली होती–पैसेही न घेता! – त्यावेळेस तिच्या मैत्रिणींनी तिची फारशी थट्टा न करता उलट तिच्यामुळंच सिनेमा फुकटात पहायला मिळाल्याचे आभार मानले होते. मात्र रजनीला सुधीरच्या त्यावेळी तिथं असण्यातली मख्खी माहीत असल्यानं ते विचार ध्यानात येताच खिन्न झाल्यावाचून राहवलं नाही! अर्थात त्याच्या पुनर्भेटीपर्यंत ही खिन्नता तिच्या मनातून केव्हाच नाहीशी झाली होती हा भाग वेगळा!

त्यानंतर शाळेच्या संमेलनाची धावपळ सुरू झाली अन् त्या तशा धावपळी गडबडीतूनही सुधीर-रजनी मात्र अधिकच जवळ जवळ आली!

रजनीच्या शाळेचे हेडमास्तर मुळातच उत्साही–हौशी असल्यानं–अन् त्यात पुन: रौप्यमहोत्सवी वर्ष यामुळं स्नेहसंमेलनासाठी भरगच्च कार्यक्रम आखले जात होते! प्रत्येक वर्गाची जबाबदारी त्या त्या वर्गशिक्षकावर टाकली गेली होती अन् ज्या










वर्गाचा कार्यक्रम अधिक चांगला होईल त्या वर्गशिक्षकाला खास बक्षीस मिळणार होतं. त्यामुळं सर्वांप्रमाणेच रजनीनंही कंबर कसली होती. सुदैवानं तिच्या वर्गातली मुलंही हौशी—कष्ट करायला एका पायावर तयार असलेली अन् अभिजात कलागुणही असलेली होती; परंतु अनपेक्षितपणे माधवनं कुठल्याही कार्यक्रमात भाग घ्यायचं नाकारलं —त्याच्यावर तर रजनीची केवढी तरी भिस्त होती! 'अभ्यासाव्यतिरिक्त काही उद्योग करणार नाही!' म्हणून सुधीरदादानं आपल्याकडनं आईच्या फोटोसमोर शपथ घेवविली आहे असं त्याचं म्हणणं होतं! शेवटी रजनीनं खुद्द त्याच्या समक्ष सुधीरला भेटून त्याची परवानगी मिळविली अन् तिच्या मनावरला एक भार उतरला!

रौप्यमहोत्सवी स्नेह-संमेलनाची तारीख जवळ येऊ लागली तसा तयारीला जोर चढला! रजनीनं आपल्या वर्गातील मुलांचे विविध कार्यक्रम बसवले होते. सुधीर एक-दोनदा माधवचं काम पहाण्यासाठी तालमींनाही येऊन बसला होता. माधवला नेण्यासाठी तो शाळेमध्ये तालमीनंतर साडेसातला रोजच हजर असे. तो आग्रह करीत असला तरी रोज त्याच्यावरोबर टॅक्सीतून जाणं बरं दिसणार नाही या विचारानं रजनी मधूनमधून महत्प्रयासानं त्याला टाळीतही असे—

दिवस वेगानं सरले अन् 'श्री शारदा विद्यालयाचं' पंचवीसावं वार्षिक स्नेहसंमेलन थाटामाटात पार पडलं! आजी-माजी विद्यार्थी, शाळेचे आश्रयदाते — विद्यार्थ्यांचा पालकवर्ग अन् आमंत्रित पै-पाहुण्यांच्या भरगच्च उपस्थितीत शाळेतल्या बालकलावंतांचे दोन दिवस कार्यक्रम चालले होते! तिसऱ्या दिवशी शाळेच्या माजी विद्यार्थिनी सिनेतारका × × × यांच्या हस्ते बक्षीस-समारंभ अन् समारोपाचे कार्यक्रम होते! परीक्षकमंडळानं उत्कृष्ट कार्यक्रमांचं बक्षीस एकमतानं रजनीला अन् तिच्या वर्गाला दिलं. त्याच वेळी दुसरं नाविन्यपूर्ण बक्षिसही जाहीर करण्यात आलं. शारदा विद्यालयात दरवर्षी मुलांच्या वतीनं त्यांना सर्वात अधिक आवडणाऱ्या शिक्षकाची निवड केली जाई अन् शाळेच्या वतीनं 'सर्वोत्कृष्ट शिक्षक' म्हणून त्या शिक्षक वा शिक्षिकेला बक्षीस मिळे.'यंदा बहुमतानुसार ते बक्षीस शाळेत यंदापासूनच काम करू लागलेल्या उत्साही अन् अर्थातच विद्यार्थीप्रिय शिक्षिका कुमारी रजनी आपटे यांना देण्यात येत आहे!' असं मुख्याध्यापकांनी जाहीर करताच टाळयांच्या प्रचंड कडकडाटात अनपेक्षित आनंदवर्षावानं अर्धवट बावरलेली, गोंधळलेली रजनी स्टेजवर बक्षीस घ्यायला गेली. अध्यक्षीणबाईंच्या हस्ते दोन्ही बक्षिसं स्वीकारून तिनं प्रेक्षागृहाकडे वळून नमस्कार केला अन् केल्या श्रमाचं चीज झाल्याच्या कृतार्थतेच्या समाधानात ती दुसऱ्या बाजूनं स्टेजच्या पलीकडे जातेय तोच अंगावर प्रकाशझोत पडल्यानं एकदम उभी राहिली—

"थँक्यू! मनाप्रमाणं फोटो मिळाला अगदी!" म्हणून खुशीनं हसत, एक हात कॅमेरावर ठेऊन सुधीर तिच्या स्वागताला उभा होता! त्या अनपेक्षित प्रसंगानं ती नुस्तीच बावरून उभी राहिली—

"माफ करा हं! अभिनंदन करायचं राहिलं — म्हणूनच बोलत नव्हता ना?"

"इश्य! काहीतरीच हे! मी एकदम तुम्हाला पाहून दचकलेच—कारण आत्ता आत्ता तुम्ही प्रेक्षागृहात माधवच्या बाजूला बसून होतात—अन् बघते तो आता माझा फोटोही काढून मोकळे! काय बोलावं तेच सुचेना!"

"तुम्ही बक्षिस घ्यायला उठताक्षणीच मीही सीट सोडून उठलो अन् इथं येऊन वाट पहात उभा राहिलो—पण धावपळीचं चीज झालं! तुमच्या चेहऱ्यावरले समाधान अन् हर्षाचे सगळे नॅचरल भाव कसे अचूक टिपता आले!"

"अच्छा! म्हणजे म्हणून तुम्ही इथं उभे होतात तर!"

"अर्थातच!—तुम्हाला मुद्दाम फोटोसाठी उभं रहा म्हटलं असतं तर तुम्ही कृत्रिम हसत उभ्या राह्यला असतात—मगाचचा तो आनंदाचा फुलोरा—तो फुललाच नसता पुनः—मुद्दाम सांगूनही! बाकी तुमच्या श्रमांचं खरोखरंच बक्षिस दिलं परीक्षकानी —केवळ त्याबाबतच्या उत्सुकतेनं बसलो होतो आतापर्यंत—निघतोच मी आता!

"म्हणजे? तुम्ही अल्पोपहाराला थांबणार नाही?"

'छे! छे!! गेले दोन दिवस मी इथंच वेळ घालवतोय की—माझा 'बास' काय म्हणेल? मला गेलंच पाहिजे—अहो, माझा प्रतिनिधी माधव आहे ना?—अन् तुमचं हे सारं केव्हा संपणार?—म्हणजे त्यावेळेला माधवला न्यायला येईनसं म्हणतोय्"

"नक्की कसं सांगू बाई? पण हे पहा, तुम्ही असं करा—माधवची काळजी करू नका! त्याला पोहोचतं करायची जबाबदारी माझी! मग झालं?"

"थँक्यू सो मच! अच्छा तर—गुडनाईट!" म्हणून सुधीरनं दोन भुवयांमध्ये हाताची बोटं जुळवून लावीत सलाम केल्यासारखं केलं अन् हसतच रजनीचा निरोप घेतला!

* *

त्यानंतर रविवारला मागं-पुढं जोडून अशी तब्बल तीन दिवसांची सुटी होती शाळेला! चौथ्या दिवशी हजेरी घेता घेता 'माधव मेहेंदळेनं' प्रेझेंट मॅडम म्हटलं नाही तेव्हा रजनीनं मनाशी विचार केला की असेल—सुटीत कुठं गेला असला तर नसेल आला म्हणून! पण तीन दिवस लागोपाठ असं झालं तेव्हा तिनं वर्गातल्या मुलाना विचारलं,

"अरे, मेहेंदळे कां येत नाही कुणाला ठाऊक आहे का?"











पण कुणालाच माहीत नव्हतं काही. त्यामुळं ती गप्प वसली. परंतु दुसऱ्या दिवशी ती वर्गात येता येता एका उत्साही मुलानं उभं राहून सांगितलं,

"वाई, माधव मेहेंदळे आजारी आहे खूप!"

"खूप आजारी? तुला कसं कळलं?" तिनं दचकूनच विचारलं.

"काल शाळा सुटल्यावर मी त्याच्या घरी गेलो होतो—माधव झोपूनच होता—त्याचा दादा म्हणाला की गेले सहा दिवस त्याला तापच येतोय म्हणून!"

ते ऐकून रजनीला सारा दिवस अस्वस्थ वाटलं! एकदा तिच्या मनात विचार आला की त्याच्या घरी जावं का?—परंतु दुसऱ्याच क्षणी तिला वाटलं की हे बरं दिसणार नाही म्हणून. असेल साधा ताप—होईल बरा! गेला महिना—दीड महिना कार्यक्रमांच्या तालमीमुळं अन् घरातल्या कष्टामुळं ताप आला असेल विचाऱ्याला!" म्हणून तिनं स्वतःचं समाधान करून घेतलं! परंतु दुसऱ्या दिवशी तिला कळलं की माधवचा ताप टायफॉईड असल्याचं डॉक्टरांनी सांगितलंय् म्हणून—कारण एक मुलगा माधवच्या घरी जाऊन आल्याचं समजताच बाकीच्या मुलातही अहमहमिकेनं ते फॅड पसरलं. सकाळी—मधल्या सुटीत—अन् शाळेनंतर माधवच्या घरी जाऊन मुलं रजनीला नवे नवे रिपोर्ट पुरवू लागली. कुणी म्हणे,

"वाई, माधवच्या अंगाला हात लावला ना—तर चटका वसला एकदम!"

"तो डोळेच उघडीत नाही, वाई,—अन् किनई त्याचा दादा म्हणत होता की तो काही बोलत नाही—सारखा निपचित पडून असतो म्हणून!" म्हणून दुसरा पुस्ती जोडी! या वातम्या ऐकून मात्र तिला अधिक धीर धरवेना. दोन दिवस तिनं कसेवसे काढले—अन् तिसऱ्या दिवशी—शाळा सुटल्यावर जेवणखाण उरकून माधवच्या घरी जायचा तिनं निर्णय घेतला—

"विचारे दोघेजण—घरात कुणी कर्तं-सवरतं माणूस आधाराला नाही वा बाईमाणूस काही करायला सवरायला नाही! माधवचं राहू द्या—पण सुधीर तरी जेवले असतील की नाही या आठ दिवसात राम जाणे! अन् एकटा माणूस तरी किती करणार? त्यात पुनः प्राणापलीकडे प्रेम आहे भावावर त्याचं—अन् अतिमाया नेहमीच अधिक हळवी असते! रोज जागरणं करीत असेल तर त्यांना काही उलट त्रासानं झालं नाही म्हणजे मिळवली!" या विचारानं तिला सारखं गलवलून येत होतं! कसावसा तिनं दिवस काढला अन् घरी आल्यावर जेवण-खाण आटोपल्यावर स्वयंपाकीणबाईशी "मला उशीरही होईल कदाचित्—वाट पाहू नका! भैय्याला झोपायला सांगा!" म्हणून निरोप ठेऊन ती बाहेर पडली. पपा काही कामाकरिता बाहेरगावी गेल्यानं तिच्या पथ्यावरच होतं!

विचारांच्या भरात ती माधवच्या घराशी केव्हा येऊन पोहोचली तिचं तिलाही कळलंच नाही! अन् दाराशी आल्यावर तिला जाणवलं ते हेच की आत एवढा काळोख कसा? धडधडत्या हृदयानं अन् कापत्या हातानं तिनं बंद दाराची कडी वाजवली—प्रथम हळू—अन् नंतर थोडया जोरानं—

"कोण आहे?"

"मी रजनी आपटे—माधवची वर्गशिक्षिका!—"

'दार उघडंच आहे—पण थांवा—दिवा लावतो!' क्षणभरातच आतला काळोख उजळला अन् रजनीनं हलकेच दार उघडलं. आत शिरल्यावर हलकेच दार ओढून घेऊन ती वळली अन्—अन् समोरचं दृश्य पाहून तिच्या हृदयात चर्रर्र झालं!

ज्या खाटेवर वसून तिनं मागं सुधीरशी साखळीवरून वादविवाद केला होता त्यावर माधव पांघरूण घेऊन पडला होता—त्याच्या उशाशी एका खुर्चीवर सुधीर कपाळाला हात लावून वसला होता. माधवच्या कपाळावर वहुधा मिठाच्या पाण्याची घडी होती. सुधीरची दाढी वाढली होतीच परंतु डोळेही खोल गेलेले होते—चेहरा अगदी फिक्कट मलूल दिसत होता. त्याच्या भरदार ताठ खांद्यांचा डौल ओसरून तो एखाद्या रोग्यासारखा दिसत होता!

"हे काय—तुम्ही वसा ना!" सुधीरच्या शब्दांनी भानावर येऊन रजनी माधवच्या खाटेवर हलकेच पायगती वसली. तिनं हळूच पांघरूण वाजूला करून त्याच्या पायांवर हात ठेवला अन् चटका वसून मागं घेतला. ते पाहून सुधीर खिन्न स्वरात म्हणाला, "ताप चिक्कार आहे!"

रजनीला तिथल्या परिस्थितीनं अवघडल्यासारखं झालं होतं—काय करावं सुचत नव्हतं. शेवटी दोन चार क्षणांनी तिनं विचारलं,












"डॉक्टर काय म्हणताहेत ?"

"डॉक्टर म्हणत होते की टॉयफॉईड आहे म्हणून. त्यांनी लिहून दिलेल्या गोळ्यांच्या दोन बाटल्या दिल्या—"

"म्हणजे, सध्या औषध बंद आहे की काय ?" रजनीनं मघेच चमकून विचारलं.

सुधीर काही बोलला नाही. त्याच्या खाली घातलेल्या मानेकडे पाहून तिच्या सारं घ्यानात आलं. ती मृदुपणानं म्हणाली,

"सुधीर तुमचे डॉक्टर कोण आहेत ? अन् त्यांनी औषध बंद केलं ते कां ?"

"त्यांनी बंद नाही केलं—मीच आणू शकलो नाही ! प्रथम दोन दिवस हा हुषारीत होता तेव्हा मी प्रत्यक्ष जाऊन डॉक्टरांना आणलं. त्यांच्या सांगण्याप्रमाणं औषघही आणलं ! परंतु गेले सहा-सात दिवस हा असा निपचित पडून असतो. औषघ आणायला जायचं म्हटलं तरी त्याच्यापास्नं दूर हलवत नाही—नाही नाही ते विचार मनात येतात. बरं, इथली बाजूची वस्ती कशी आहे तुम्ही जाणताच आहात—या खालच्या वर्गातील लोकांची त्यांच्या मुलाबाळांच्या कुसंगतीची साव-लीही माधववर पडू नये म्हणून माझ्या आईनं अन् तिच्या पश्चात् मी जिवापाड प्रयत्न केले—त्यांच्याशी संबंधही ठेवला नाही. माझं हे पत्र्याचं खोपटं किती एका बाजूला आहे तुम्ही पहाताहातच ! मग औषध कुणाला कसं सांगायचं आणायला—अन् डॉक्टर तरी या गरीबाच्या घरी कशाला पायघूळ झाडताहेत बोलावल्याविना —शेवटी दैवावर हवाला ठेवून गेले सात दिवस-रात्न हा असा बसून आहे मी याच्या उशाशी ! काय करावं ते सुचेनासं झालंय बघा !" बोलता बोलता त्याचा गळा दाटून आला. आतापर्यंत तो खालच्या मानेनंच बोलत होता; परंतु एकदम त्यानं वर पाहिलं अन् रजनीच्या नजरेला नजर देऊन, काकुळतीच्या केविलवाण्या स्वरात विचारलं,

"आपटेबाई—खरं सांगा, तुम्हाला काय वाटतं ? माझ्या भावाला आराम पडेल का हो ? ह्या जिवघेण्या दुखण्यातनं तो उठू शकेल तरी का ?"

रजनीला हा प्रश्न एकदम अनपेक्षित होता—अन् त्वरित उत्तर देण्यासारखाही नव्हता—अन् त्याहूनही त्याच्या त्या रडवेल्या स्वरानं तिलाही गुदमरल्यासारखे झालं—ती काहीतरी बोलू शकण्याआधीच निराशेनं मान झटकीत सुधीर एकदम म्हणाला,

"तुम्हालाही काही आशा वाटत नाही ना ! माझी भीतीच शेवटी खरी ठरणारसं दिसतंय—म्हणजे. म्हणजे—खरंच करू तरी काय ! आईला नेऊन परमेश्वराचं समाधान झालेलं दिसत नाही म्हणून तो माझ्यापासून माझ्या या लाडक्या भावा-लाही घेऊन जाणारसं दिसतंय्—आई ग ! आपटेबाई, माझ्या आईच्या मृत्यूनंतर केवळ याच्यासाठी म्हणून मी सारं सहन केलं—जिवापाड श्रम केले—सारं सोसलं—पण पण—हाच जर मला सोडून गेला तर मग मी जगू तरी कशाच्या आधारावर ?—मी खरोखरच वेडा होऊन जाईन हो !" अन त्यानं हताशपणे डोकं दाबून धरलं अन् भितीवर डोकं टेकलं—अन्

—अन् रजनीला जाणवलं की त्याच्या गालावरून घळघळा अश्रू वाहताहेत म्हणून ! दुःखावेग असह्य होऊन त्याला हुंदक्यांवर हुंदके येत होते अन् गालांवर अश्रू ओघळत होते—

रजनीलाही त्याचे शब्द ऐकून अन् त्याचे अश्रू पाहून भडभडून आल्यासारखं झालं. आजवर मोठ्या पुरुषाला दुःखा-वेगानं रडताना तिनं फारसं पाहिलं नव्हतं. अगदी पहिल्यांदा तिनं पाहिलं होतं ते तिच्या पपांना—तिच्या आईच्या मृत्यूनंतर रडताना ! त्यावेळी ती वरीच लहान असल्यानं तिला फारसं काही समजत नसलं तरी नोकराचाकरांच्या वोलण्यावरून वा घरात घडणाऱ्या प्रसंगांवरनं पपा आईला फार छळतात एवढं निश्चित जाणवत होतं—त्यामुळं पपांचं ते रडणं पाहून तिला वाटलं होतं आश्चर्यच—की पपा आईला रोज मारायचे—बोलायचे मग ती रागावून गेली तर आता कां रडताहेत म्हणून—मात्न वाढत्या वयाबरोबर पपांचं बदललेलं वागणं अन् स्वभाव पाहून तिला मग वाटू लागलं होतं की पपांचे ते अश्रू पश्चात्तापाचे असावेत !

दुसऱ्यांदा तिनं पाहिलं होतं ते तीनेक वर्षापूर्वी आनंदभैय्याला रडताना ! एका ख्रिश्चन मुलीशी त्यानं केलेल्या भानगडीनं शेवटी त्या ख्रिश्चन मुलीनं जीव दिल्यानं प्रकरण पोलिसात गेलं होतं—अन् गळचाशी येऊन भिडणारसं वाटताच एरवी दिमाखानं वागणारा तिचा आनंदभैय्या पपांच्या एका दोस्त सुपरिटेंडंटपुढं ढसाढसा रडला होता—अर्थात् मागाहून पपांनी त्या मित्राच्या हस्ते सारं मिटवलं होतं ती गोष्ट वेगळी ! परंतु त्यावेळचा भैय्याचा भ्याड-पणा पाहून रजनीच्या मनात मात्न त्याच्या-बद्दल कायमचा तिरस्कार—घृणा उत्पन्न झाली होती !

परंतु आज सुधीरला रडताना पाहून मात्न तिला सहानुभूतीच वाटली त्याच्याबद्दल ! एक समर्थ, ताठ अन् कणखर पुरुष परिस्थि-तीच्या चक्रव्यूहात, संकटांच्या कोंडीत सापडून असहाय्य झाला होता, झगडून झगडून हताश झाला होता अन् आपल्या असहायतेबद्दल अश्रू ढाळीत होता !—'त्याला अशावेळी आपण धीर द्यायला हवा — सावरायला हवं' या विचारानं रजनीनं त्याला पाचसात मिनिटं मुक्तपणे रडू दिलं अन् मग हलकेच उठून ती त्याच्या बाजूला जाऊन बसली.

"सुधीर !" तिच्या मृदु हाकेसरशी त्यानं एकवार तिच्याकडे पाहिलं अन् पुनः मान फिरवली. त्याच्या खांद्याला स्पर्श करीत ती म्हणाली,

"असा धीर सोडून कसं चालेल" माणसानं ? परिस्थिती कठीण आहे हे कबूल आहे—परंतु आपण शक्यतो प्रयत्न केले पाहिजेत ! नुसतं हातपाय गाळून काही होणारेय का ? मग चला उठा पाहू —अन् आधी बाहेर पडून डॉक्टरना घेऊन या ! सुधीर,—

सुधीरनं शर्टाच्या बाहीनं डोळे कोरडे केले अन् तिच्याकडे वळून तो अस्फुटपणे म्हणाला,

[ पृष्ठ ४६ वर पहा ]








## मराठीतील एक श्रेष्ठ कादंबरी
## स्वस्त पुस्तक योजनेत



महाराष्ट्रातील दोन विद्यापीठांनी एम्. ए. साठी नियुक्त केलेल्या आणि महाराष्ट्र शासनाचे प्रथम पारितोषिक मिळविलेल्या या कादंबरीबद्दल व्यक्त झालेली काही सुज्ञांची मते :

- यंदाची सर्वोत्कृष्ट कादंबरी
- ही कादंबरी महाराष्ट्रात घरोघर वाचली जावी
- कादंबरी वाचावयास घेतली की संपविल्याशिवाय खाली ठेववत नाही
- झपाटणे म्हणजे काय याचा प्रत्यय देणारी आणि विलक्षण अस्वस्थ करणारी कादंबरी
- श्री. ज. जोशी यांच्या प्रतिभेने नवी झेप घेतली आहे.

# आनंदी गोपाळ

श्री. ज. जोशी

स्वस्त आवृत्तीची किंमत रुपये ७.५०
भरून आपली प्रत आजच नोंदवा

---

**नोंदणी सुरू आहे...... श्रीगणपती उपासकांसाठी संतोषकारक वार्ता**

सिद्धहस्त लेखक : **गोपाल नीलकण्ठ दाण्डेकर** यांच्या शैलीदार मधुर मराठी भाषेत श्रीगणेशपुराणाचा रसमय भावानुवाद

# श्री ग णे शा य न

**पृष्ठे सुमारे ३००, किंमत ६ रुपये, श्रीगणेश चतुर्थी, दिनांक १५ सप्टेंबर १९६९ रोजी प्रसिद्ध होत आहे.**

**प्रकाशनपूर्व सवलतीची किंमत रुपये ३.७५ फक्त भरून आपली प्रत आजच नोंदवा**

## प्रकाशनपूर्व सवलतीची किंमत
## रुपये ३.७५ फक्त
## भरून आपली प्रत आजच नोंदवा

**मॅजेस्टिक बुक स्टॉल** गिरगाव नाका मुंबई ४ • शनिपाराजवळ, पुणे २






# लोहगड ते लंडन

**—श्री. ह. सी. उर्सेकर**



मी एक ज्ञानयात्री आहे. पुस्तक आणि प्रवास ही माझी दुचाकी. लहानपणापासून या दुचाकीचा उपयोग करून ज्ञानगंगेच्या किनाऱ्याने गती आहे, प्रगती आहे किंवा नाही माहीत नाही! प्रवास म्हणजे ज्ञानसाधना, परदेशयात्रा ही जीवनयात्रेची काशी अशी बालसुलभ समजूत उराशी बाळगून 'काशीस जावे नित्य वदावे' या चालीवर जगाची सफर करावी हा अनंतकाळचा ध्यास, विशाल जग पाहून दृष्टी विशाल होते. ज्ञानाची क्षितिजे विकास पावतात. विज्ञानाच्या कक्षा रुंदावतात. केल्याने देशाटण पंडितमैत्री होतेच असे नाही पण सामान्यांचा सहवास मिळू शकतो. आंतरराष्ट्रीय बाबतीत उचित समजुती व्हायला मदत होते. 'नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' हेच खरे!

१९६८ च्या ऑगस्टमध्ये मला जेव्हा लंडनला जायचा योग आला तेव्हा सारा प्रवास मी एकट्यानेच केला. या लंडनच्या दौऱ्यात जरी मला हवाई जहाजामुळे सोबतीची जरूर भासली नाही तरी आमच्या लोहगडला जायला मात्र नेहमीच साथ-संगत हवी. लहानपणापासून अत्तापर्यंत लोहगडलाच लंडन मानत आलो. कारण लोहगडला जाणे म्हणजे परदेशी जाण्यासारखेच आहे. लोहगडला गेल्यावर निसर्गाच्या सान्निध्यात सर्व काही आपोआपच विसरायला होतं. लंडन घरापासून हजारो मैल दूर असल्यामुळे आपल्या मातृभूमीचं वातावरण विसरायची इच्छा नसली तरी ते विसरायला लावतं. आपल्या घरादाराचा आणि नित्याच्या जीवनाचा विसर पाडणारं लोहगड आणि लंडन!! लोहगडला विमान जात नाही लोहगडवरून मात्र जाते. पण त्याचा आपल्यास काय उपयोग! तिथे पोहचायचे म्हणजे जंगलपहाडातूनच पायी प्रवास.

अशा या लोहगडला मित्रांसमवेत गेल्या वर्षी गेलो असता फिनलंडमधील हेलसिंकी येथे आंतरराष्ट्रीय समाज कल्याण परिषदेला जाण्याचा योग आला आहे अशी खबर मिळाली. झाले, तसाच मुंबईला परत आलो. 'घर पहावं बांधून, लग्न पहावं करून" या दमछाकी द्वंद्व सुभाषिताला "परदेशाला पहावं जाऊन" असे समर्पक शेपूट जरूर लावता येईल. पासपोर्ट, व्हिसा (Visa), रिझर्व बँकेचा 'पी' फॉर्म, आरोग्यरक्षक टोचण्या, प्रवास-सुविधा कंपन्यांकडे हेलपाटे घालणे वगैरे पूर्वतयारी करण्यात अनेक महिने अपूर्व अनुभव घ्यावे लागतात ते मलाही घ्यावे लागले.

थोड्या दिवसात पुष्कळ देश पाहयचा सोस केला की न सोसणारी धावपळ करावी लागते. विमानतळावर उतरल्यावर पासपोर्ट, व्हिसा दाखवून बाहेर पडावे लागते. भारतीय पासपोर्ट म्हणजे भारतीय नागरिकाला भारताबाहेर जाण्याची भारत शासनाने दिलेली परवानगी. पासपोर्ट हा स्वदेशी तर व्हिसा परदेशी! ज्या देशात आपण प्रवेश करतो त्याने दिलेली प्रवेशपत्रिका म्हणजे व्हिसा. शक्यतो व्हिसा आपल्या प्रवासी-एजंटातर्फे भारतातच घ्यावेत म्हणतात. पण ते कठीण काम म्हणून निराश—नर्व्हस् होण्याचे कारण नाही. प्रत्येक राजधानीत परदेशाचा दूतावास असतोच. तेव्हा नॉर्वेचा व्हिसा लंडनमधील नॉर्वेच्या दूतावासात जरूर मिळू शकेल पण वेळ मात्र हवा! इंग्लंडमध्ये मात्र आपल्याला व्हिसा लागत नाही, कारण भारत ब्रिटीश राष्ट्रकुलाचा सभासद आहे, तसाच जर्मनीलाही व्हिसा नको. व्हिसा बहुधा विनामूल्य मिळतो पण काही देश मात्र व्हिसा फी आकारतात. कैरोचे विमानतळावर व्हिसा फी घेऊन ताबडतोब व्हिसा देतात.

आपले सामान ताब्यात घेणे, आपल्याजवळील डॉलर किंवा पौंड देऊन त्या देशाचे चलन बदलून घेणे, विमानाचे पुढचे आरक्षण

झाले किंवा नाही ते बघणे आणि या सर्व ध्येयधोरणांच्या धांदलीत विमान अड्डयावरून गावात जाणारा कोच निःसंकोच पकडणे ह्या सर्व गोष्टी व्यवस्थितपणे साधणे म्हणजे तारेवरचा नाटयमय नाच आहे. विमानतळावर पाऊल टाकताच स्थानिक वेळेप्रमाणे घडयाळ लावून घेण्यास विसरलात की आपल्या वेळापत्रकाचे बारा वाजलेच ! आणि प्रवासात तुम्ही एकटेच असलात म्हणजे ह्या सर्व व्यवधानास तोंड देण्यास तानाजी मालुसऱ्यांचीच छाती पाहिजे.

बरे हॉटेलमध्ये जाऊन पोचल्यावर विश्रांती... जरा टाईम्स वाचत पडतो हं—वगैरेस वाव नाही. त्या शहरात पाहण्यासारखे काय, पर्यटन बसेस केव्हा सुटतात, लंच कुठे घ्यायचे वगैरे उद्योग सुरू होतात. नगर-पहाणी करून रात्री दमून घरी म्हणजे हॉटेलात परतता तो उद्याचे सकाळचे विमान पकडायचे ना तर सामान बांधणे पहाटेच्या टॅक्सीची व्यवस्था, हॉटेल बिल चुकवणे वगैरे गोष्टी न चुकता कराव्या लागतात. पण या साध्या गोड गैरसोयी होत !

१५ ऑगस्ट १९६८—स्वातंत्र्यदिनाच्या राष्ट्रीय मुहूर्तावर 'सबिना' या बेल्जियन कंपनीच्या ७२७ बोईंग विमानाने सकाळी ९ वाजून १० मिनिटानी मी मुंबई सोडली. प्रचंड बोईंग जेट विमान. उजव्या बाजूस तीन जागा, डाव्या बाजूस दोन—मध्ये येण्याजाण्याचा मार्ग. प्रत्येक आसनावर विजेचा छोटा दिवा. वाऱ्याचा झोत सुरू करण्याचे बटण. तसेच हवाई सुन्दरीला पाचारण करण्याचे बटण तेथेच असते. हॉटेलमध्ये वेटरला बोलावण्याची घंटा अनेकदा वाजवून गिऱ्हाईकालाच 'वेटर' (वाट पहाणारा) व्हावे लागते पण विमानात विद्युत बेल वाजवताच विजलीसारखी हवाई-सुंदरी स्मितमुखाने सन्मुख येते. हवाई सुद व हवाई सुंदरी यांची नीटनेटकी ये-जा. १२५ प्रवाशांचे विमान होते पण निम्म्या जागा रिकाम्या; त्यामुळे मुंबईमधील मराठी चित्रपटाच्या थेटरात बसल्यासारखे वाटले. तेवढयात एका आकाशसुन्दरीने विमानातील वायुव्यवस्था विस्कटल्यास तुमच्या नाकासमोर एक गॅस-मुखवटा छतातून टपकेल व तो कसा लगेच तोंडावर बसवावयाचा याचे प्रात्यक्षिकक करून दाखवले. धूम्रपान बंद करा, पट्टे आवळा अशा विजेरी पाटया समोर तेजाळल्या. विमानाची यंत्रणा सुरू झाल्याचे कानी आले. अलगद विमान सुरू झाले. धावपट्टीवरून थोडे पुढे गेल्यावर विमान थांबले पण यंत्रांचा आवाज वाढला. झाले, विमानाने झेप घेतली. जरा वेळाने खटक आवाज आला. विमानाची चाके त्याचे पोटात ओढली गेल्याचे समजले.

खिडकीशेजारी मला जागा मिळाली. भूप्रदेश एखाद्या शत-रंजचे पटासारखा वाटला. मोठमोठी घरे त्यावरील क्षुद्र प्यादी ! पश्चिम रेल्वेचे रूळ म्हणजे एखाद्या प्रचंड पाटीवर पोराने आखा-लेल्या ओळीसारखे भासले. हां हां म्हणता जमीन सरली व सागरा-वरून राजहंसासारखे डौलात आमचे विमान उडू लागले. जरा वेळाने मेघांच्या कमलवनातून राजहंस झेपावू लागला.



## श्री. हरिहर सी. उसेंकर

मुंबईचे अॅडीशनल प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट श्री. ह. सी. उसेंकर हे विद्वान आणि रसिक साहित्यिक असून गेल्या वर्षीच्या ऑगस्टमध्ये ते चौदाव्या आंतरराष्ट्रीय समाजकल्याण परिषदेला भारतीय शिष्टमंडळाचे सदस्य म्हणून हेलसिंकी (फिन्लंड) येथे गेले होते. सदर परिषदेत त्यांनी दोन प्रबंध वाचले. तेथून परतताना त्यांनी इंग्लंड, पश्चिम जर्मनी, फरान्स, स्कॅण्डीनेव्हियन देश आणि ईजिप्त या देशांचाही त्यांनी दौरा केला, त्याचेच हे प्रस्तुत रसीले वर्णन.

श्री. उसेंकर हे नामांकित कायदेपंडित असून १९३९ ते १९४७ पर्यंत ते मुंबई हायकोर्टात वकिली करीत होते. नंतर त्यांनी न्यायखात्यात नोकरी पत्करली आणि ज्युडीशियल मॅजिस्ट्रेट व सिव्हिल जज्ज म्हणन त्यांनी अनेक ठिकाणी काम केले. सध्या ते अॅडीशनल प्रे. मॅजिस्ट्रेट आहेत.

त्यांनी कायदेविषयक संशोधनात्मक लिखाण खूपच केले आहे. संस्कृतचे तर ते गाढे पंडित आहेत आणि इंग्रजी, मराठी, संस्कृत व गुजराती या भाषांतून त्यांची संस्कृती, कला व विज्ञान या विषयावर अनेक लेख प्रसिद्ध झाले आहेत. मुंबई, ठाणे, कल्याण इत्यादि ठिकाणच्या रोटरी क्लबातून आणि आकाशवाणीवरून त्यांनी विविध विषयांवर व्याख्यानेही दिली आहेत. त्यांचे हे प्रवासवर्णन 'दीपावली'च्या वाचकांना आवडेल अशी आम्हास खात्री आहे.

—संपादक

हवाई सुंदरीनें एक नकाशा हाती दिला. आम्ही आता ३२,००० फुटावरून ताशी ५८० मैल वेगाने कराचीच्या दिशेने चाललो होतो. विमानावाहेर ३२° फॅरनहीट तपमान होते पण आत आम्ही वातानुकुलित विमानाच्या उबेत होतो. फरेंच, इंग्रजी वर्तमानपत्रांचे वाटप झाले. बरोबर १० वाजता न्याहारी आली. न्याहारीची प्लॅस्टिकमय आरास इतकी सुंदर होती की सुरुवात कुठे कशी करावी हा प्रश्न पडला ! अगदी हॅम्लेटसारखा प्रश्न पडला पहावे की खावे !

विमानाच्या नाकात वैमानिक. त्याच्या मागे पहिल्या वर्गाचे प्रवासी, मध्ये कोठीघर—त्यापलीकडे आम्ही सुमार-वर्गाचे प्रवासी व शेपटात टॉयलेट खोल्या. न्याहारीनंतर काही मुरलेले प्रवासी खुर्च्यांमधले पुष्ट मखमली हात दूर करून म्हणजेच चेअर कम् वेड करून व्यवस्थित वामकुक्षी करीत होते. त्यांना उशा, ब्लँकेटे पुरविली जात होती. सुमारे १०-३० वजता कराची मागे पडले. ११-३० च्या सुमारास पाकिस्तान मागे पडून इराणवरून आम्ही उडत होतो. खाली निर्जल, निःस्तृण वाळवंट पसरले होते. तहान लागली—मृगजळ दिसले; पण त्याने तहान कशी भागणार म्हणून हवाई सुंदरीजवळ पाणी मागितले. सँडविच-सह पाणी मिळाले. वालुकामय प्रदेशात सँडविच देण्यात तिच्या औचित्याचे कौतुक वाटले. मला अजून आश्चर्य वाटते की या विनपाण्याच्या, बिनसावलीच्या वैराण वाळवंटातून नादीरशहाच्या बेफाम फौजा हजारो मैल हिंदुस्तानवर कशा चालून आल्या असतील ! तो मार्ग मात्र आम्हाला दिसला.

इतक्यात विमानात सांद्र संगीताचे सूर घुमू लागले. आता लवकरच तेहरानला विमान थांबेल अशी मंजुळ हवाई घोषणा कानी पडली. खाली पाहिले तो हिरव्यागार भूप्रदेशाचे पट्टे दिसू लागले. मातीची धाब्याची चौकोनी घरे दाटीवाटीनी वसलेली दृष्टीस पडली. सौभद्रातील 'गिरीवर सौदागिर मांडी' या अण्णांचे पदाचे छायाचित्रच जणु विमानातून मला दिसले. तेहरानच्या समांतर रस्त्यावरून जाणाऱ्या लाल मोटारी मृगाच्या किड्या-प्रमाणे वळवळत होत्या.

पुन्हा धुम्रपान बंद, पट्टे आवळायच्या पाट्या चमकल्या. १२-५०-ला तेहेरानच्या मेहेरबाद विमानतळावर उतरलो. स्थानिक वेळे-प्रमाणे फक्त ११ वाजले होते. सुमारे ३॥। तासांनी भूमीवर पाय टेकले. थेट प्रवाशांच्या कक्षागृहात गेलो. माझ्यासारख्या मुंबई-कराला इराणमधील उंच, मिशाळ हॉटेलवाल्यांचाच हातगुण माहीत होता. पण येथे इराण्यांनी विणलेले गुबगुबीत गालीचे पाहून इराण्यांच्या हस्तकौशल्याची कल्पना आली. बाराकोनी कपबशा पर्शियन लोकांच्या कलासक्तीच्या द्योतक वाटल्या—कारण सौंदर्य कोनात—वक्रतेत खुलते, सरळ रेषेत नाही. मुंबईत इराण्यांचा गुलाबी चायच फक्त दिसतो पण तेहरानचे विमानतळावरील गेंदेबाज पर्शियन गुलाब मोठे डौलदार वाटले.

इराणच्या रेगीस्तानात कोमल गुलाबांची पैदास होते त्याच पर्शियात फिरदोसी, शेख, सादी, उमर खय्यामासारखे कवी निर्माण झाले. खरोखर कवी म्हणने मानवी जीवनात फुललेले गुलाब ! गुलाब म्हणजे कोमलता आणि सौंदर्य. उमर खय्यामच्या दोन सचित्र रुबाया विमानतळावर लावलेल्या आहेत. सोबत त्यांचे इंग्रजी व फरेंच तर्जुमे दिले आहेत. पलीकडे इराण मिली बँकेचा तक्ता टांगला होता. रियाल हे इराणी चलन. पण त्यात रियालबरोबर भारतीय रुपये किती हे कोष्टक नव्हते. डॉलर, पौंड जरूर होते.

दारातच एक उंच धिप्पाड मुछवाला इराणी फौजदार उभा होता. मुंबईतील हॉटेलच्या गल्ल्यावरील एखादा गलेलठ्ठ इराणीच पोलिसी पोषाख घालून मायदेशाला आला असावा असे मला वाटले.

दुपारी २-१५ वाजता तेहरान सोडले. पाऊण तासाने एक प्रचंड सरोवर हिरव्यागार पार्श्वभूमीवर चमकले. निसर्गसुंदरीचा दर्पणच तो. त्यात निसर्गाचे सौंदर्य प्रतिबिंबित झाले होते. इतक्यात तुर्कस्थानवरून विमान जाऊ लागले. तो पुन्हा तसेच प्रचंड सरोवर नजरेस पडले. बाणभट्टाने कादंबरीत वर्णन केलेले अच्छोद सरो-वरच वाटले ते. एक होते इराणी अच्छोद तर दुसरे तुर्की अच्छोद. ही दोन सरोवरे विमानातून निसर्गरमणीच्या नेत्राप्रमाणे तुर्की सरोवर पाचूप्रमाणे हिरवेगार होते. इतक्यात तो प्रसन्न जलाशय आणि आमचे बोईंग यांच्यामध्ये पांढरे शुभ्र मेघ तरंगू लागले. जणु बगळ्यांचा थवाच त्या सरोवरात पोहू लागला होता. अथवा शुभ्र कमळांचा ताटवाच सरोवरातून अचानक वर फुटला तर नाही ना ! इतक्यांत लंच आले. ३-३० वाजले होते माझ्या घड्याळाप्रमाणे, पण स्थानीय वेळेप्रमाणे दीड वाजला होता. म्हणून उशीराच का होईना पण टाईमशीर लंच मिळा-ल्याचे कागदी समाधान मिळाले.

विमान आता अथेन्सचे तळावर थांबेल अशी स्वागतार्ह सूचना कानी पडली. मंजुमधुर अदृश्य आवाजात विमानात ऐकू येणाऱ्या या सूचना म्हणजे संस्कृत नाटकातील आकाशभाषितेच होत ! तेहरान सोडल्यास ३॥ तास झाले होते. ५-४५ वाजता अथेन्स आले. प्लेटो, सॉक्रेटीसांची हीच ती ग्रीसभूमी ! प्राचीन युरोपीय संस्कृतीचे माहेरघर ! जगज्जेत्या शिकंदराची वीर-भूमी ! अथेन्स विमानतळाच्या अवतीभवती उघड्या बोडक्या उनाड टेकड्या आहेत. छोटी भुरक्या रंगाची घरे ! तुर्कस्तान व ग्रीस यामधील डार्डानल्सची सामुद्रभूमी ओलांडून विमान उतरले. समुद्र संपतो आणि लगच विमानतळ असे मोठे विलोभनीय दृश्य अथेन्सवर पाय रोवण्यापूर्वी दिसले.

अनुक्रमणिका




**अवशेष**

पुणे-मुंबई हमरस्त्यावर एक खेडेगाव होतं. तिथल्या ग्रामस्थांनी मुख्यमंत्र्यांना विनंती केली की आमच्या गावात शिवकालीन अवशेष सापडले आहेत. समारंभपूर्वक ते सरकारला अर्पण करण्याची आमची इच्छा आहे. तरी आपण अगत्य येण्याचे करावे.

त्या विनंतीला मान देऊन मंत्रीमहाशय सरकारी लवाजम्यासह त्या खेडेगावी समारंभास हजर झाले. मुंबई-पुणे हमरस्त्यावरील दोन-तीन मैल लांबीचा रस्ता लतापल्लवांनी सुशोभित करण्यात आला. मंत्रीमहाशय व लवाजमा त्या रस्त्यावरील खड्डे चुकवीत समारंभाच्या स्थळी आला.स्वागत-समारंभ इ. पार पडले. शिवकालीन अवशेष पहाण्यास मंत्री व अन्य अधिकारी उत्सुक होते. शेवटी एक-दाचे स्थानिक पुढारी बोलावयास उठले,

"आपण सर्वजण शिवकालीन अवशेष पहाण्यास उत्सुक आहात तितकेच ते अवशेष आपल्यासारख्या सूज्ञ माणसांच्या हातात देण्यास आम्ही आतुर आहोत. आता आपण ज्या रस्त्याने समारंभाच्या स्थळी आलात त्या रस्त्यावरील खड्डे शिवकालीन आहेत. रस्त्यावरील सर्व 'शिवकालीन खाचखळगे' आम्ही ग्रामस्थ मंडळी आनंदाने सरकारला अर्पण करीत आहोत."

**उद्योगी सरदारजी**

चंडीगडच्या रॉकेट बेसवरून पहिले भारतीय रॉकेट मंगळावर जाण्यास सज्ज झाले. रॉकेट सुटायला पाच-दहा मिनिटांचाच अवधी होता. एक बाई धावत पळत त्या रॉकेटजवळ आली व आकाश-यानातील वैमानिकास म्हणाली :

"आपण मंगळावर चालला आहात ना, मग मेहरबानी करून हा डबा मंगळावर माझ्या जसवंतसिंगाला द्या."

एवढे बोलून त्या बाईने एक टिफीन कॅरिअर त्या वैमानिकाच्या हातात दिला. वैमानिक आश्चर्यचकीत होऊन म्हणाला :

"बाई ! काय करतो तुमचा जसवंतसिंग मंगळावर ?"

"काय म्हणजे रॉकेटचे स्पेअरपार्टस विकायचं त्याचं दुकान आहे मंगळावर." बाईंनी शांतपणे उत्तर दिले.

**जलद इलाज**

एका धनाढ्य व्यापाऱ्याचा मुलगा झाडावरून पडला व त्याचा पाय मोडला. तावडतोब त्याला डॉक्टरांकडे नेण्यात आले. डॉक्टरांनी एक्स रे काढल्यावर सांगितले, "तुमच्या मुलाच्या पायाचे हाड मोडले आहे. त्याचा पाय दोन महिने तरी प्लॅस्टरमध्ये बांधून ठेवावा लागेल."

मुलाचे वडील एकदम अस्वस्थ झाले, कारण त्या मुलाचे लग्न महिन्यावर येऊन ठेपले होते. ऐन लग्नाच्या वेळी मुलाचा पाय प्लॅस्टरमध्ये बांधल्यावर कसे होणार ?

"डॉक्टर काय वाट्टेल ते करा. पैशाची फिकीर नाही. डब्बल प्लॅस्टर बांधा पण, पोरगं महिन्याच्या आत पायावर उभं हवं."

व्यापाऱ्याने डॉक्टरना मार्ग सुचविला.

**शेजारी**

मालती ५४१६ नंबरला फोन करून करून कंटाळली. पण फोन लागायचं चिन्ह दिसेना. शेवटी तिनं ५४१५ नंबरला फोन केला. त्या फोनवरून आवाज आला,

"हॅलो ऽऽ–कोण पाहिजे आपल्याला ?"

"हॅलो ऽऽ आपण फोन नंबर ५४१५ वरून बोलत आहात ना !" मालतीनं विचारलं.

"हो. काय काम आहे आपलं ?" फोनवरून आवाज आला.

"माफ करा जरा तुम्हाला तसदी देते. मला ५४१६ नंबरला फोन करायचा होता. पण काही केल्या फोन लागेना. जरा प्लीज तुमच्या शेजारच्या नंबरला ५४१६ ला बोलावता का फोनवर ?" मालतीनं विनंती केली.

**आणखीन्**

सुप्रसिद्ध कवि सोपानदेव चौधरी यांच्या अध्यक्षतेखाली एका महिला मंडळाचे संमेलन होते. अध्यक्षांचा परिचय करून देण्या-करिता एक महिला भाषण करू लागली "आजचे आपले अध्यक्ष आणखीन् कवि सोपानदेव आणखीन् चौधरी आणखीन् महाराष्ट्रातील एक सुप्रसिद्ध कवी आहेत. आणखीन् ते आज नाशिक-हून इथं आलेत. आणखीन् त्यानी पुष्कळ कविता केल्या आहेत. सोपानदेवांचा तो सारा परिचय असा 'आणखीन्'ने भरलेला होता.

संमेलन संपल्यावर चहापानाचा कार्यक्रम चालू असता त्या महिलेने सोपानदेवांना लाडीकपणे विचारले, "कसं झालं माझं भाषण ?"

"छान् !" सोपानदेव म्हणाले, "पण 'आणखीन्' थोडं पाहिजे होतं."

त्यांच्या बोलण्यातील खोच काही त्या महिलेच्या लक्षात आली नाही. ती म्हणाली, "मला आणखीन् खूप-खूप सांगायचं होतं, पण आणखीन् वेळच नव्हता."

**एका हॉटेलमधील सूचना**

"तुम्हाला तुमच्या सिगारेटची थोटके चहाच्या कपात टाका-यची असली तर वेटरला तसे आधीच सांगा. म्हणजे तो तुमचा चहा तुम्हाला अॅश ट्रे मधून आणून देईल."

— **शाम शिराळकर**

अथेन्सच्या विमानतळावर उतरलो. हीच माझी आणि युरोपची प्रथम धूळभेट. अथेन्सचा विमानतळ फार गजबजलेला दिसला. तेथे Free Shop अशी पाटी वाचली. मला वाटले हे कसे ? सर्व वस्तू काय फुकट देणार ! छे Free म्हणजे Duty Free. करमुक्त दुकान–स्वस्त दुकान ! ग्रीसमधील सुंदर कलाकृतींचे नमुने येथे होते. ग्रीक भूमीची रम्य रंगीत छायाचित्रांची कार्डे पण विकत मिळत होती.

अथेन्सहून तासाने विमान सुटले. माझ्या घड्याळात पावणेसात झाले होते. पण तेथे मात्र ऊन रणरणत होते. कारण ऑगस्ट म्हणजे युरोपातील ग्रीष्म ऋतू ! आणि ग्रीक वेळेप्रमाणे साडेतीनच झाले होते. आता विमान पूर्ण भरले होते.

आतापर्यंत पश्चिमेकडे झेपावणारे आमचे बोईंग उत्तरेकडे झुकले. युरोप पंखाक्रान्त करीत रात्री १ ला ऑस्ट्रियाची राजधानी व्हिएन्ना येथे आम्ही उतरलो. पण पुन्हा रात्रीचा दिवस झालेला येथे दिसला. कारण व्हिएन्नाचे वेळेप्रमाणे फक्त दुपारचे ४-३० वाजले होते. म्हणजे सुमारे ७॥ तासात मुंबई ते व्हिएन्ना प्रवास पार पडला होता, पण वस्तुतः १२ तास प्रवास झाला होता. तेव्हा कालमान हे सापेक्ष आहे हा आईन्स्टाइनच्या सापेक्षतावादाचा एक भाग तरी मला पटला.

व्हिएन्ना म्हणजे युरोपातील संगीताची पंढरी ! येथे आज रात्री मुक्काम. पण या संगीत क्षेत्रात पडलेले माझे पहिले पाऊल मात्र बेसूर ठरले. विमानात छोटी एअरबॅग माझ्याजवळ होती पण कपड्यांची बॅग विमान कंपनीच्या ताब्यात मुंबईस मी देऊन चुकलो हुतो. आता ती बॅगच चुकली होती एखाद्या गुरासारखी ! कारण बॅग विमानातून उतरलेल्या सामानात नव्हती. युरोपियन दुःशासनाने आपले वस्त्रहरण केल्याची जाणीव झाल्यावर देवाचा धावा आणि धावाधाव दोन्ही सुरू झाली. एकाने दिलासा दिला, 'हे युरोप आहे. येथे बॅग जाणार नाही.' विमान कंपनीत तक्रार नोंदवून शहराच्या मध्यवर्ती असलेल्या हॉटेल अँबासडरमध्ये हलक्या हाताने, पण जड पावलांनी प्रवेश केला.

पुन्हा एक पेचप्रसंग उभा राहिला. रात्री भोजन की रात्री भ्रमण ! रात्रीच्या भोजनात गुंतलो तर निशाकालीन व्हिएन्ना दाखविणारी बस मिळत नव्हती. पोटाच्या भुकेपेक्षा डोळ्यांची भूक अधिक अनावर असते. कारण पोटाची भूक शमल्याचे समाधान तात्कालीक असते तर अनुभवलेले नेत्रसुख दीर्घकाल सुखवते. काही विचार न करता भोजनगृहात न शिरता रात्री भ्रमणयानात पाऊल टाकले.

१९५५ पासून ऑस्ट्रिया हे प्रजासत्ताक राज्य आहे. लोकवस्ती सुमारे पाऊण कोट फक्त. त्यात नऊ राज्ये आहेत. आल्पस् पर्वत, डॅन्यूब नदी व दर्दभरे संगीत याविषयी हा देश प्रसिद्ध आहे. राजधानी व्हिएन्नाची अठरा लाखांची वस्ती. शहर स्वच्छ, लख्ख आहे. दुसऱ्या महायुद्धात नष्ट झालेली घरे पुन्हा बांधण्यात आली. त्यांची एक व्यावहारिक शोभा आहे. शहरातील जुन्या घरांची मात्र एक प्रकारची बादशाही शान आहे. व्हिएन्ना विश्वविद्यालयात सुमारे वीस हजार विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. डॅन्यूब नदी ऑस्ट्रियातून पश्चिमपूर्व वहाते. इंद्रायणीकाठी ज्ञानेश्वर तुकारामांची प्रतिभा शब्दरूप झाली तसेच या डॅन्यूब नदीकाठी बीथोवान, मोझार्ट, हेडन, शूबर्ट वगैरे जगविख्यात संगीतकारांची सुरश्री बहरली. अजूनही डॅन्यूब नदीच्या परिसरात स्वप्नाळू संगीत लहरीवर ऑस्ट्रीयनांचे जीवन फुलत असते.

रस्ता ओलांडण्यासाठी येथे भुईबोगदे आहेत. त्यात उतरण्यास विजेचे सरकते जिने ! श्रम थोडे आणि पादचाऱ्यांची सुरक्षितता व वाहनांना जलदीने जाण्याची सोय सर्वच गोष्टी साधल्या आहेत.

'कॉस्मॉस' कंपनीच्या प्रशस्त बसमधील गाईड इंग्रजी व फ्रेंच भाषेत मोठ्या विनोदी पद्धतीने आम्हा परदेशी निशाचरांस शहराचे सौंदर्य सुनवीत होता. व्हिएन्नामधील कलाकुसरीच्या पद्धतीने बांधलेली सेंट स्टीफनसारखी चर्चेस् प्रसिद्ध आहेत. रस्त्यातून बस जाताना आमच्या गाईडचे शब्दशः धुंद धावते समालोचन चालू होते. वाटेतील भारतीय दूतावास असलेली इमारत खूप प्रचंड वाटली. त्याच इमारतीत 'एअर इंडिया'ची कचेरी आहे.

'प्रेटर' उद्यानात ६५ मीटर उंचीच्या राक्षसी चक्रात बसून शहराची शोभा अवर्णनीय दिसली. डॅन्यूब नदीवरील तो जगप्रसिद्ध मनोरा. या चक्रावर फिरणारी आगगाडीच्या लाल डब्यासारखी वाहने आहेत. भगवत् गीतेतील 'भ्रामयन्सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया' या ओळीची आठवण त्या मयपुरीत मला तीव्रतेने झाली. राक्षसी चक्रापलीकडे अत्यंत वेगाने फिरणारे पाळणे वगैरे मायेफिरू करमणूक आहे. नजिकच तो पाणी सोडणारा छोटा मुलगा निःसंकोच साऱ्या जगाला अर्घ्य देत उभा आहे.

'प्रेटर' यक्षभूमीतून आम्हाला 'ग्रीनझीग' या उपनगरातील एका इनमध्ये नेण्यात आले. तिथे संगीत व नृत्य यांची मेजवानीच होती. जगविश्रुत ब्लू डॅन्यूबचे सूर तेथे ऐकायला मिळाले. वाद्यकारांनी हिरवी तंग जाकिटे घातली होती. एक वादक दोन हातांनी ड्रम वाजवत होता आणि पायांनी झांजांचा स्टॅण्ड चालू ठेवला होता. कोंकणी गाण्यासारखे गाण्याचे सूर सुरू झाले व मायभूमीची याद आली. वाटले संगीत हीच खरी आंतर-भारती होय ! संगीत हा सर्वांना सांधणारा दुवा आहे.

'कॅसनोव्हा' नाईट क्लबमध्ये युरोपातील सर्वात कुशल पाकीटमारांच्या हस्तलाघवाचे दर्शन झाले. ते जोडपे वाटेल त्याच्या खिशातून सर्वांच्या डोळ्यादेखत पण कुणालाही नकळत पासपोर्ट, पाकिटे वगैरे काढी व अर्थात् थँक्ससह परत करी. एका अमेरिकनाचा टाय पॉकेटमार रमणीने केव्हा उडवला त्यालाही कळले नाही. त्या चपलांगुलीने तो टाय जेव्हा त्याला सस्मित परत केला

अनुक्रमणिका






तेव्हाच त्याला व आम्हालाही ह्या गळेपडूपणाचा इतिहास कळला. यानंतर खिसापाकीट समालके हॉटेलवर आम्ही रात्री १ ला म्हणजे भारतीय वेळेप्रमाणे पहाटे ५-३० ला परत आलो. पण दिलेले ऑस्ट्रियन शिलिंग वसूल झाले अशा समाधानाने मी हॉटेल-वर परत आलो. शिलिंग हे ऑस्ट्रियाचे मुख्य नाणे. १०० ग्रोशेनचा एक शिलिंग होतो. कपडयाची बॅग हरवल्याची खपली निघाली पण सुमारे पंचवीस तासानंतर सुटासकट निद्राधीन झालो.

सकाळी ९॥ वाजता 'सविना' कंपनीचा फोन आला की बॅग त्याच विमानाने पुढे ब्रुसेल्सला गेली होती ती परत व्हिएन्नाच्या विमानतळावर आणली आहे. झालं, वस्त्रहरणावर पडदा पडला !

सामान विमानतळावर परस्परच पुढे गेल्याने हलक्या हाताने व्हिएन्नाच्या विमानतळावर गेलो. कारण युरोपात सामान आपल्यालाच हाताने उचलून न्यावे लागते. काही विमान-तळांवर छोट्या ढकलगाड्या असतात पण त्यांचे ढकले आपणच ! मला वाटते विमान कंपनीने २० किलोच वजन नेण्याची मुभा आकाशयात्रीस ठेवली आहे ती विमानाच्या वाहतुकीचे सामर्थ्या-पेक्षा प्रवाशांची वाहतूक ताकद लक्षात घेऊनच निश्चित केली असावी.

सकाळी ११॥ वाजता 'सविना' कंपनीच्या विमानाने व्हिएन्ना-हून ब्रुसेल्सकडे झेप घेतली. आता आम्ही जर्मनीवरून उड्डाण करीत होतो. हवामान समाधानकारक नसल्याने विमान आणि आमचा जीव खाली वर होत होता. आज विमानाचा वेग जरा जास्त वाटला. घराकडे जाणारा बैल अधिक तेज पळतो ना ! कारण ब्रुसेल्स हे 'सविना' विमान कंपनीचे माहेरघर !

बेल्जियम् हा सुमारे बारा हजार चौरस मैलांचा युरोपच्या वायव्येस जीव धरून राहिलेला छोटा देश. पण इतिहास मात्र मोठा. नेपोलियनचा पराभव ड्यूक ऑफ वेलिंग्टनने बेल्जियम-मधील वाटर्लूच्या रणभूमीवर केला. पहिल्या महायुद्धात गाज-लेली इप्रिस, घेंट वगैरे रक्तरंजित रणक्षेत्रे बेल्जियमच्या भूमी-वरीलच होत. बेल्जियमने रूबेन्ससारखे जगविख्यात चित्रकार निर्माण केले. पण आपल्याला या देशाचा परिचय आहे तो बेल्जियम्-काच सामानाचा व आरशांचा. त्याचा प्रथमदर्शनी प्रत्यय ब्रुसेल्सला विमानाचे पाय लागताच आला. तेथील हवाई स्थानक म्हणजे एक प्रचंड शिशमहालच आहे. सगळे काचेरी विश्व ! विजेरी पट्ट्यावरून बॅग खालून निमूट वर आली. त्या पट्ट्यावरून उसवलेल्या, दोऱ्या गुंडाळलेल्या बॅगा वर येत होत्या. ताक करताना लोणीवर यावे तसे वाटले. त्या पाशबद्ध पेट्या पाहून क्षणभर भाऊच्या धक्क्याची आठवण झाली.

ब्रुसेल्सच्या विमानतळावरून शहरात रेल्वे स्टेशनपर्यंत सुंदर विजेची रेलगाडी आहे. एखाद्या महाराजाच्या महालात शोभणाऱ्या मखमलीची आसने डब्यात होती. त्याला आपल्या कपड्याची धूळ न लागेल अशा खबरदारीने अलगद् आसनावर बसलो.

हॉटेल मेट्रोपोल या शंभरी ओलांडलेल्या हॉटेलात मुक्काम ठोकला. खोलीतील काचेरी स्नानगृह इतके विलोभनीय होते की वाटले त्या स्नानगृहातून बाहेरच पडू नये. जन्मभर तेथेच स्नान करावे. युरोपीयन हॉटेलातील स्नानगृहे आपल्या देवघरांपेक्षा स्वच्छ ठेवलेली असतात. हॉटेलात लिफ्ट स्वयंचलित होते. मुंबईच्या लोकलप्रमाणे वेगाने एकदम चालू होई. बटण दाबलेला मजला आला की सुमारे पाच फूट आधी त्याची गती मंदावे आणि त्या विवक्षीत मजल्यावर लिफ्ट थांबे, दार अपोआप उघडून बंद होई.

मेट्रोपोल हॉटेल ब्रुसेल्समधील प्लास द ब्रुकेर या प्रसिद्ध दुकान क्षेत्रात ( Shopping Centre ) मध्ये आहे. समोर पंचवीस फूट उंचीचा बीअरचा पेला पिवळ्या प्रकाशाने सारखा भरतो व रिकामा होतो. मानवी जीवनाची जाहीरातच वाटली मला ती. आयुष्याचा पेला भरतो–रिता होतो आपल्याला नकळत. पलीकडे चबुतऱ्यावर एक धनुर्धारी आल्या-गेल्यांवर शरसंधान करीत असताना दिसतो. शेजारच्या प्रचंड हॉटेलात दरवाज्या-पाशी कोणीतरी थॉमस कूक स्टीकचे तुकडे मोठ्या लालभडक जाळावर भाजत होता. त्यामुळे अनेक गिऱ्हाईके गरमागरम स्टीक घेऊन जात होते. कशी आहे गिऱ्हाईके आकृष्ट करण्याची नेत्रदीपक शक्कल ! आपल्याकडे कुल्याच्या शेपटचा लोकप्रिय








आहेत तर बेल्जियन लोक बैलाच्या शेपटयांचे पक्वान्न चवीने खातात असे कळले.

ब्रुसेल्समध्ये ट्रामगाडया फार जलद धावतात. त्यात बसून शहराचा फेरफटका केला. वाटेत बेल्जियममधील सर्वात उंच 'मार्टीनी' ही तीस मजली गगनचुंबीनी प्रेक्षणीय वाटली. पुस्तकांची दुकानें पुष्कळ दिसली त्यामुळे आनंद झाला. बेल्जियममध्ये फरेंच, डच व जर्मन अशा तीन शासकीय भाषा आहेत.

रात्र थोडी आणि जिज्ञासा फार हा व्हिएन्नाचा अनुभव जमेस घरून प्रवासी वसने ब्रुसेल्सच्या निशादर्शनास निघालो. बेल्जियममध्ये कलात्मक लेस तयार होते. त्याचे नमुने पाहिले. मुंबईत पहायला वेळ नसतो. जगातील सर्वात सुंदर मंडई ब्रुसेल्स-मध्ये आहे. चारी बाजूने गोथिक स्थापत्यशास्त्राचे प्रेक्षणीय नमुने असलेल्या इमारती आहेत. या चौकात मोटारी व फुले दाटीवाटीने ठेवलेली आढळतात. ऑटोमिडीन टॉवर चार वर्षा-पूर्वी जागतिक जत्रेच्या वेळी उभारण्यात आला. त्यावर सौदा-मिनीसारख्या विजेच्या लहरी विहार करीत असतात ती शोभा अपूर्व आहे. मध्यरात्रीच्या सुमारास शहर शोभा पाहून 'मेट्रोपोल'-मध्ये परत आलो.

दुसऱ्या दिवशी सकाळी खिडकी खरेदी (Window Shopping) केली. पण आज फिनलॅंडला पोचायचे होते. विमान बाराचे होते. तेव्हा दहाला बाडबिस्तरा उचलला व विमान अड्ड्यावर जाण्यासाठी विजेच्या लोकलमध्ये बसलो. खूप गर्दी होती दारात सामान व रेल्यात्री दोन्हींची गर्दी होती; पण गाडी सुटेना. कुठले तरी यंत्र 'नाही मी बोलत'च्या मूडमध्ये होते. विमा-नाची वेळ होत आली. पण गडबड, आरडाओरडा वगैरे घाटकोपरी मुळीच नाही. गार्ड आला व त्याने सांगितले गाडी बदला. शिस्तीत सर्वजण ससामान उतरले व शेजारच्या गाडीत बसले. विमान मिळाले; कारण हवा खराब असल्याने तेही उशीरा सुटले.

स्कॅण्डिनेव्हियन कंपनीचे होते ते आकाशयान! दुपारी दोनला डेन्मार्कमधील कोपनहेगन विमानतळावर आलो. हायसे वाटले, कारण वाटेत विमान फार हलले.

कोपनहेगन विमानतळ प्रचंड आहे. हवा पावसाळी होती. वातावरण कुंद होते. एका टेलिव्हिजन पडद्यावर मधूनमधून सूचना-कन्यकेचे सशब्द चित्र येई. ती इंग्रजी, फरेंच व डॅनीश भाषेत विमान वाहतुकीबाबत खणखणीत सूचना देई. शेजारी तशाच टेलिव्हिजन पडद्यावर विमानांचा इंडिकेटर सारखा फिरत होता. दोन दोन मिनिटांनी विमान सुटत होते. चर्चगेट स्टेशनवरील संध्याकाळ आठवली. पुढचे विमान स्टॉकहोमपर्यंतच होते, थेट हेलसिंकीचे नव्हते. म्हणजे पुन्हा विमान बदलणे आले. कोपनहेगन स्टॉक-होम मार्गावर उत्तरी वारे वेगाने वहात असल्याने विमानाची हालचाल फार भासली. एका तासात स्टॉकहोम आले. पुन्हा खाली उतरून स्टाकहोम ते हेलसिंकी विमान पकडले. पण चालू वर्गात जागा नसल्याने विमान कंपनीने आपणहून पहिल्या वर्गात माझी व्यवस्था केली. प्रसादचिन्हच होते ते!

स्टॉकहोम ते हेलसिंकी ही ब्रुसेल्स-हेलसिंकी प्रवासातील तिसरी तंगडी होती. हवा चांगली वाटली. प्रवासात माझ्याशेजारी एक जर्मन व्यापारी होता. इंग्रजी त्याला उत्तम येत असल्याने प्रवासाचा तास कसा गेला ते जाणवले नाही. वाटेत आम्ही बाल्टिक समुद्र ओलांडला व फिनलंडमधील हेलसिंकी विमानतळावर सायंकाळी सहाला उतरलो.

**[ अपूर्ण ]**

---

[ पृष्ठ ३८ वरून—**चक्रव्यूह** ]

"परंतु डॉक्टरांना आणून काही होईल-लसं वाटतं का तुम्हाला? —नाहीतर—नाहीतर मला भीती वाटतेय् की कुठल्याही क्षणी ह्याचं काय होणारेय कुणी नेम सांगावा—मी आपला बाहेर जाईन अन् परत यायच्या आतच काही वेडंवाकडं—

"चच्—भलतंच बोलू नका!" रजनीनं मधेच त्याला गप्प करीत म्हटलं. "डॉक्टर-सुद्धा हमी कशी देतील? पण तेवढंच तुम्हालाही समाधान की आपल्या हातात होतं तेवढं सारं केलं आपण म्हणून! नाहीतरी शेवटी आपल्या हातात त्याहून काय आहे—सर्वशक्तिमान् परमेश्वरावर हवाला टाकन आपण काय ते करीत रहायचं! मग तुम्ही जाताय का मीच जाऊ? —पटकन् घेऊन येते तुमच्या डॉक्टरांना —"

"नको—तुम्हाला सापडणार नाही त्यांचा दवाखाना—लांब आहे! मीच जातो—तुमच्या शब्दांनी मलाही फार मोठा धीर आलाय बघा—कुणीतरी धीर द्यायला असलं की संकटांचंही वाटत नाही काही! गेले आठ दिवस भुतासारखे मी कसे काढले माझे मला माहीत!" अन् तो उठला. त्यानं कपडे चढवले—परंतु रजनीच्या दृष्टीतून त्याचे कापणारे हातपाय सुटू शकले नाहीत. काही न बोलता तिनं आत जाऊन स्टोव्ह पेटवला —

"काय करताहा—प्लीज, तुम्ही निष्कारण तसदी घेऊ नका!"

"मला ठाऊक आहे—काळजीनं तुम्ही चार दिवसात जेवला-खाललाही नसाल! अंगात शक्ती नको का रहायला? गरम गरम चहा घेतलात तर हुषारी येईल बघा —"

चहा घेतल्यावर तो जायला निघणार एवढयात रजनीनं पर्समधनं शंभराची नोट काढली अन् त्याच्यापुढं करीत ती म्हणाली,

"तुमच्याजवळ असतील त्यात ही भर ठेवून घ्या—नाही म्हणू नका! लागले तर तुम्हाला उपयोगाला येतील!"

सुधीरनं मुकाटयानं नोट स्वीकारली अन् एकवार कृतज्ञपणे रजनीकडे पाहून तो झटकन् बाहेर पडला. रजनीनं माध-वच्या कपाळावरची घडी बदलली अन् त्याच्या उशाशी ती बसून राहिली.

**[ अपूर्ण ]**



# बँकांचे राष्ट्रीयीकरण

**बँकांचे राष्ट्रीयीकरण झाले म्हणजेच बँका सरकारी मालकीच्या झाल्या आहेत. त्यामुळे शेती व छोटे उद्योगधंदे या उपेक्षित व्यवसायांना आर्थिक साहाय्य लाभेल अशी अपेक्षा**

बंगलोर यथे कांग्रेस अधिवेशनात ठराव झाल्यानंतर दिनांक १९ जुलै ६९ रोजी वटहुकूम काढून देशातील प्रमुख चौदा बँकांचे राष्ट्रीयीकरण केल्याचे जाहीर झाले. देशात समाजवाद आणण्यासाठी जे धोरण ठरले त्याची तातडीने अंमलबजावणी झाली पाहिजे ही भूमिका पंतप्रधान श्रीमती इंदिरा गांधी यांनी पत्करली. अर्थात् राष्ट्रीयीकरण प्रत्यक्ष जरी एवढ्या तातडीनें झाले असले तरी या प्रश्नावर चर्चा आज कित्येक वर्षे होत आहे. राष्ट्रीयीकरण व्हावे का होऊ नये अशा दोन्ही मतप्रणाली आहेत. राष्ट्रीयीकरण झाल्यानंतर या अधिक स्पष्ट झाल्या आहेत. प्रत्येकी ५० कोटी रुपयांच्या वर ठेवी असलेल्या चौदा बँकांच्या २७०० कोटी रुपये ठेवी व स्टेट बँक ऑफ इंडियाच्या १२०० कोटी रुपये मिळून व्यापारी बँकातील ९० % ठेवी होतात. आपल्या देशात एकूण खासगी ७६ बँका आहेत. १४ बँका व स्टेट बँक मिळून ९० % ठेवी असल्याने एवढ्यांचेच जरी राष्ट्रीयीकरण झाले तरी देशातील सर्व खाजगी बँकिंग व्यवसायाचे राष्ट्रीयीकरण झाले आहे असेच मानले पाहिजे. बँकिंग व्यवसाय याचा साधा व सोपा अर्थ म्हणजे स्वतःचे भांडवल, कर्जे, लोकांच्या कडून घेतलेल्या ठेवी अशा विविध तऱ्हेनें पैसा जमा करणे व तो शेती, उद्योगधंदे, व्यापारउदीम इत्यादींसाठी क़र्जाऊ देणे, घेतलेल्या ठेवीवरील देणे, व्याज व दिलेल्या कर्जावरील घेतलेले व्याज यातील जो फरक ती बँकांची मुख्य मिळकत, यात बँकाना ठेवीदारांचे विश्वस्त ही भूमिका पार पाडावयाची असते. राष्ट्रीयीकरण झालेल्या १४ बँकांची परिस्थिती पाहिली तर असे दिसून येते की डिसेंबर १९६८ अखेर या बँकांकडे २७५० कोटी रुपयांच्या ठेवी होत्या; परंतु त्यांचे जमा भांडवल केवळ २८.५ कोटी रुपये होते. याचा अर्थ भांडवलाच्या १०० पट ठेवी आहेत. या सर्व ठेवी जनतेने ठेवलेल्या. तेव्हा बँकांचा सर्व व्यवहार चालला तो जनतेच्या पैशावर. मग सर्वसामान्य जनतेसाठी बँकानी काय केले? असा प्रश्न साहजिकच निर्माण झाला.

## काळच हे ठरवील!

भारतासारख्या शेतीप्रधान देशात ७० ०/० जनता शेतीवर अवलंबून आहे. परंतु शेती व्यवहारात या बँकांनी किती रक्कम गुंतविली तर हे प्रमाण त्यांच्या एकूण गुंतवणुकीच्या २ टक्केही नाही. देशाची उन्नती अन्नधान्य उत्पादनाच्या वाढीवर अवलंबून आहे. व ते उत्पादन वाढावे म्हणून विविध योजना हाती घेण्यात आल्या आहेत. बंधारे, विहिरी, लिफ्ट इरिगेशन, संकरित बी-बियाण्यांचा वापर, खतांचे उत्पादन, वापर इत्यादि त्या योजना होत. सहकारी बँक शेतीसाठी कर्ज देत आहेत, परंतु केवळ या बँकांच्या साधनसंपत्तीवर शेतीसाठी लागणारा कर्जपुरवठा पुरेसा पडणारा नाही. म्हणून व्यापारी बँकांनीही पुढे आले पाहिजे, त्यांचे निधी या कारणी लागले पाहिजेत आणि हे साध्य व्हावयाचे म्हणजे देशातील बँका सरकारी मालकीच्या झाल्या पाहिजेत. त्याखेरीज हे होणार नाही अशी ठाम भूमिका बंगलोर अधिवेशनात कांग्रेसने घेतली. शेतीसाठी कर्जपुरवठा, अविकसित भागास साहाय्य. छोटे व्यावसायिक यांच्या गरजा पुरविणे हे राष्ट्रीयीकरण करण्यामागील हेतू आहेत. "राष्ट्रीयीकरण हे साध्य नसून साधन आहे. तेव्हा ही उद्दिष्टे कितपत यशस्वी होतील हे काळच ठरविणार आहे."

**म. गो. चंद्रचूड**

## रिझर्व्ह बँकेचा जन्म

आपल्या देशात बँकिंग व्यवस्था एक शतकाहून अधिक काळ अस्तित्वात आहे; परंतु ती कशी असावी याची काही निश्चित मांडणी तीन योजना होऊनही ठरलेली नाही. एकोणीसाव्या शतकाच्या सुरवातीस ब्रिटिश मॅनेजिंग एजन्सीच्या पद्धतीबरोबर त्यांच्या व्यापारउदीमास साहाय्यासाठी बँका अस्तित्वात आल्या. ब्रिटिश राजवटीत मुंबई (१८४०), बंगाल (१८०९) व मद्रास (१८४३) या तीन राज्यात स्थानिक बँका प्रस्थापित झाल्या. तथापि बँकिंग व्यवसायाची खरी वाढ १९०६ ते १९१३ या काळात झाली. परंतु पहिल्या महायुद्ध काळात व तदनंतर



## चंद्र आणि कवींचा चंद्र

पृथ्वीचा परीघ ओलांडन
गेला मानव
अवघ्या अवकाशात
विहरत मुक्तपणे
खिजवीत नक्षत्र तारकांना.
अवकाश 'अनन्त' उरलेच नाही!
अवकाशाच्याच पाऊल वाटेवरून
पृथ्वीचा चेंडू
अनन्त अवकाशाची "कविता"
करणारांवर भिरकावून देत
नव्या हनुमंताने
घेतली झेप चंद्राकडे.
मनात गुणगुणत एक गाणे
"तोच चंद्रमा नभात"
पण त्याला दिसलेला चंद्र
"तो" नव्हता.
त्याला नव्हते खळे
त्यावर नव्हता रथ
नव्हते घोडे, धवल रंगाचे
नव्हती शीतलता.
नव्हते हास्य.
नव्हत्या पाऊलखुणा –
चंद्राचा वेध घेत –
रमणीला घेऊन –
मधुचंद्रासाठी धावलेल्या –
कुणा मानवाच्या.
होते दगडधोंडे –
अन् मोठे खड्डे (ही)
"चंद्रा"वरची अवघी कविता
गाडली हनुमंताने त्या खड्ड्यात.
त्यावर ठेवले खूप दगड –
तिथलेच !
आणि लिहिला शिलालेख –
"कवींचा चंद्र" येथे सुखाने पहुडला
आहे !!

– प्रभाकर अत्रे

बऱ्याच बँका डबघाईला आल्या, व यामुळे बँकांवर सरकारी नियंत्रणाची गरज प्रकर्षाने जाणवू लागली. याचा परिणाम म्हणून वरील तीन बँकांची मिळून १९२१-मध्ये "इंपीरियल बँक ऑफ इंडिया" प्रस्थापित झाली. १९३० मधील मंदीची झळ अनेक बँकांना लागली. बँकिंग इन्क्वायरी कमिटीने सर्व बँकांवर नियंत्रण ठेवणारी मध्यवर्ती बँक असावी अशी शिफारस केल्यावरून १९३४ मध्ये रिझर्व बँक ऑफ इंडिया' स्थापन झाली. तदनंतर निरनिराळ्या मॅनेजिंग एजंटस्च्या गटांनी आपल्या व्यवसायांच्या गरजा भागविण्याच्या कल्पनेतून अशा गटागटांच्या खाजगी बँका उदयास आणल्या हा इतिहास सांगावयाचे कारण म्हणजे मूलतः भारतीय बँका उद्योग व्यवसायांच्या गरजा भागविण्यासाठी प्रस्थापित झाल्या कारणाने त्यांची वाढ नागरी विभागात व या उद्योगधंद्यांच्या ठिकाणीच अधिक प्रमाणात झाली. शेतीसाठी कर्जपुरवठा करणे जरूर आहे, त्यासाठी खेडोपाडी बँकेच्या शाखा उघडणे आवश्यक आहे हे. रिझर्व बँकेने नेमलेल्या गोरावाला कमिटीने स्पष्ट केले. या कमिटीने १९४९ साली आपला अहवाल सादर केल्यानंतर इंपीरियल बँक ऑफ इंडिया हिचे रूपांतर "स्टेट बँक ऑफ इंडिया"त झाले. सरकारने या बँकेच्या शाखा देशभर काढण्याचे व या बँकेद्वारे शेतीसाठी व छोटे व्यावसायिक इत्यादींना कर्ज पुरविण्याचे धोरण ठरविले. गेली २० वर्षे या एका बँकेचा राष्ट्रीयीकरणाचा अनुभव आज आपल्या जमेस आहे. तो विशेष समाधानकारक नाही. ३० जून १९६९ च्या अखेरीस भारतात ५८३ गावे अशी आहेत की त्या ठिकाणी व्यापारी बँकांच्या कचेऱ्या अद्याप नाहीत. १०,००० वरील वस्तीच्या १०० गावांची यादी व १०,००० खालील वस्तीची १९० गावांची यादी नुकतीच या ठिकाणी शाखा उघडण्यास म्हणून व्यापारी बँकांकडे धाडण्यात आली होती.

### सामाजिक नियंत्रण अपुरे ठरले

त्याचप्रमाणे या बँकानी शेतीसाठी कर्ज द्यावे म्हणून गेल्या फेब्रुवारीस त्यांच्यावर सामाजिक नियंत्रणाचे बंधन लादले होते. या कायद्यानुसार त्यांचे अध्यक्ष पूर्ण वेळ काम करणारे असावेत, संचालक मंडळावर त्यांनी सहकार, शेती, छोटे उद्योगधंदे यांचे प्रतिनिधी घ्यावेत अशी अट घालण्यात आली होती. राष्ट्रीयीकरण व अराष्ट्रीयीकरण यातील सुवर्णमध्य म्हणून ही योजना अमलात आली; परंतु गेल्या सात-आठ महिन्यांचा अनुभव काही विशेष समाधानकारक दिसला नाही असे पंतप्रधानांचे म्हणणे. त्यांचे म्हणणे असे की सामाजिक नियंत्रण सरकारने केले, तथापि बँकांच्या संचालक मंडळावर पूर्वीचीच मंडळी राहिली व त्यांनी सरकारच्या सूचनांचे सर्वतोपरी पालन केले नाही. सामाजिक नियंत्रण अंमलात आल्यानंतर व्यापारी बँकांनी दिलेली शेती कर्जे पुढारलेल्या भागातील बागाईतदारांना दिली. त्याचा परिणाम केवळ धनको बदलला. अविकसित भागात जाऊन व आपल्या नफ्यापैकी काही भाग सामाजिक कारणासाठी लागावा म्हणून काही निधी निर्माण करून तो सरकारने सूचित केलेल्या कामी लावावा अशी अपेक्षा होती ती सफल झाली नाही. आणि म्हणून राष्ट्रीयीकरणाचा निर्णय तातडीने घ्यावा लागला. नियोजन मंडळाचे एक सदस्य श्री. वेंकटय्या यांच्या अध्यक्षतेखाली रिझर्व बँकेचे देशातील शेती पतपुरवठा सिंहावलोकन करण्यासाठी एक समिती नेमली होती. या समितीचा अहवाल नुकताच बाहेर पडला आहे. या समितीनेही म्हटले आहे की केवळ सहकारी बँकांनी शेती कर्ज देऊन पुरेसे पडणार नाही. शेती कर्जाची गरज इतकी वाढते आहे की व्यापारी बँकांनीही त्यासाठी पुढे आले पाहिजे. व व्यापारी व सहकारी बँकांनी एकमेकास पूरक राहून हे कार्य केले पाहिजे. अर्थात् आता सर्व बँकांचे राष्ट्रीयीकरण याच उद्देशाने झालेले आहे; परंतु सहकारी व राष्ट्रीयीकरण झालेल्या बँकात








सुसूत्रता कशी आणावयाची हे ठरविण महत्त्वाचे आहे. अर्थात् राष्ट्रीयीकरण होण्या-पूर्वी बँकांची कार्यपद्धती, बैठक व रचना कशी असावी याचा अभ्यास करण्यासाठी श्री. आर. पी. सरैय्या यांच्या अध्यक्षते-खाली एक समिती नेमली आहे आणि ती या प्रश्नाचा विचार करीत आहे.

## दप्तर दिरंगाई टाळली पाहिजे

बँकांचे राष्ट्रीयीकरण झाले म्हणजे आता सर्व बँका सरकारी मालकीच्या झाल्या. या बँकांवर आता सरकारमार्फत सल्लागार मंडळे नेमली जाणार. सरकारी खाते म्हणजे दिरंगाई, अवाढव्य खर्च, लोकां-बद्दल अनास्था असे चित्र लोकांपुढे आहे. त्यामुळे या बँकांतूनही आता अशीच स्थिती प्राप्त होईल अशी भीती अनेकजण बोलून दाखवीत आहेत. पूर्वी कर्जाचे अधिकार, अध्यक्ष व मोठ्या कर्जासंबंधी निर्णय संचालक मंडळ घेत असे. निरनिराळ्या बँका असल्यामुळे प्रत्येक बँक आपला धंदा कार्यक्षम होण्याच्या दृष्टीने प्रयत्नशील असे. आता सर्वच निर्णय सरकारचा प्रति-निधी म्हणून काम करीत असलेल्या "कस्टोडिअन"ला घेता येणार नाहीत. तेव्हा दरवेळी त्या त्या सरकारशी निर्णया-त्मक गोष्टींसाठी धाव घ्यावी लागली तर विलंब लागणार. सर्वच बँका सरकारी. त्यामुळे चुरशीचाही प्रश्न राहिलेला नाही. त्यामुळे शिथिलता वाढण्याचा धोका संभ-वतो असे अनेकांचे मत आहे. ही गोष्ट सरकार कशी काय टाळणार आहे ते पहा-वयाचे आहे. महत्त्वाची गोष्ट म्हणजे सल्ला-गार मंडळ नेमताना सरकारला फार काळजी घ्यावी लागणार आहे. डॉ. चिंता-मणराव देशमुख यांनी राष्ट्रीयीकरणाबाबत बोलताना म्हटले आहे की सध्या जी श्रेष्ठी मंडळी दिसतात त्यांच्या हातात बँका गेल्या तर ज्या कारणासाठी राष्ट्रीयीकरण कर-ण्यात येत आहे तो हेतू कितपत सिद्धीस जाईल याची शंका वाटते. असे होऊ नये म्हणून सल्लागार मंडळावरील लोक अनु-भवी, सचोटीचे, निःस्पृह अर्थतज्ञ यातून निवडले पाहिजेत. केवळ काही लोकांची "वर्णी" लावायची म्हणून त्यांना नेमल्यास उद्दिष्टाप्रत जाणे कठीण होईल.

राष्ट्रीयीकरणाचे बँकेच्या सेवकवर्गाने स्वागत केले आहे. सेवकवर्गाचे प्रश्न मोठ्या कौशल्याने हाताळणे जरूर आहे. स्टेट बँकेचा पंधरा दिवस चाललेला संप आपल्यासमोर ताजा आहे. राष्ट्रीयीकरण होताच एका मोठ्या बँकेतील श्रेणी सर्वत्र लागू करावी अशी मागणीही आलेली आहे. राष्ट्रीयी-करण सर्वच बँकांचे झाले आहे तेव्हा आता सेवकातील असंतुष्टतेचे परिणाम एका-दुसऱ्या बँकेपुरते मर्यादित न राहता सर्वत्र व्यापक होणार आहेत हे विसरून चालणार नाही.

## बँका म्हणजे आर्थिक रक्तवाहिन्या

देशाच्या आर्थिक विकासात बँकांचे स्थान अतिशय महत्त्वाचे आहे. सर्व आर्थिक देवघेव चलनाच्या रूपाने चालत असते. बँका या चलन वाहणाऱ्या रक्तवाहिन्या आहेत असे म्हटले तर वावगे होणार नाही. तेव्हा प्रत्येक भागाला आवश्यकते प्रमाणे व सतत रक्त पुरविणाऱ्या शरीरातील शीरांचे महत्त्व त्यांना आहे. त्यांचे राष्ट्रीयीकरण झाले आहे. झाले हे चांगले की वाईट ते त्यातील होणाऱ्या परिणामावरून भविष्य काळात ठरणार आहे. सरकारचीच बँक असल्याकारणाने ठेवी ठेवणारांना काहीच धोका नाही. व्यापारी बँकांनी ग्रामीण भागा-तून अधिकाधिक ठेवी गोळा कराव्यात असे नेहमी म्हटले जात असे. ही गोष्ट राष्ट्रीयी-करण केलेल्या बँका कशी काय करतात ते पहावयाचे आहे. राष्ट्रीयीकरण झाले, परंतु या बँका आता आपला कार्यक्रम पार पाड-ण्याच्या दृष्टीने कशी यंत्रणा आखणार यासंबंधी अद्याप काहीच सुस्पष्ट कल्पना नाही. सध्या आहेत त्या बँका तशाच युनिट्स म्हणून चालू राहणार एवढे समजले आहे. पंतप्रधानांनी एक धाडसी निर्णय घेतला आहे. धाडसी निर्णयाबद्दल त्यांचे सर्वत्र स्वागतच होत आहे. आता यापुढील पावलेही सर्व परिस्थिती लक्षात घेऊन त्या टाकतील अशी अपेक्षा आहे.

•••










रजतमहोत्सवी
वर्षानिमित्त
खास लेख
:४:



—प्रभाकर अत्रे

# दीपावली

# दिवाळी अंकातील कथा

'दीपावली'चा जन्म एक 'वार्षिक' म्हणून झाला. मराठीतले पहिले दीपावली वार्षिक म्हणून झाला आणि साहित्य-कला-संगम ही प्रतिज्ञा मनोमन जपत जपत दीपावलीने रौप्य महोत्सवी वर्षात पदार्पण केले आहे. पंचवीस वर्षे! मासिकाच्या आयुष्यात तरी हा कालखंड तसा मोठा आहे आणि हे वाढणे हे जेव्हा नुसतेच वाढणे नसते तेव्हा तर ह्या कालखंडाला एक सुवर्णस्पर्श सहजच लाभतो. गेल्या पंचवीस वर्षात 'दीपावली'ने 'वार्षिका'तून मासिकाकडे झेप घेतली असली तरीही 'दीपावली' वार्षिकाचे स्वयंपूर्ण, स्वयंभू आणि आदरणीय (काहींच्या मते दिवाळी अंकांचा बादशहा वगैरे वगैरे) असे स्थान दीपावलीने टिकवून धरले आहे. हे स्थान त्यातल्या विविधांगी कला माध्यमातील प्रयोगशीलतेमुळे जसे मिळाले आहे तसेच ते 'दीपावली'ने मराठी साहित्याला दिलेल्या अमोल अशा साहित्यधनामुळेही मिळाले आहे. चित्रकार—संपादक दीनानाथ दलालांच्या कुंचल्याने बहुरंगी आणि बहुढंगी 'चित्रसज्जा' दिली असली आणि ते दीपावलीचे 'मान' धन असले तरीही गेल्या पंचवीस वर्षात 'दीपावली'ने कला-साहित्य-संगमाच्या प्रतिज्ञेशी इमान राखले आहे हे मान्य करावेच लागेल. साहित्य क्षेत्रातील विविध प्रयोग-प्रयत्नांबद्दल काही लेख प्रसिद्ध झाले आहेत. अजूनही काही होतील. पण दिवाळी अंकांचे प्रामुख्याने आभूषण म्हणून मानल्या गेलेल्या (आज ही जागा लघु-दीर्घ कादंबऱ्या घेऊ पहात आहेत .असे दिसत आहे.) कथा-साहित्याचा, त्यासाठी केल्या गेलेल्या प्रयोग-प्रयत्नांचा, त्याबाबतच्या संपादकीय दृष्टीचा आणि संपादन केलेल्या यशाचा परामर्श घेण्याचा हा एक प्रयत्न! अर्थातच ह्या प्रयत्नाला काही अंगभूत मर्यादा आहेत ही गोष्ट प्रथमच नमूद करतो. पहिली मर्यादा स्वतःची, दुसरी मर्यादा पृष्ठांची, तिसर मर्यादा म्हणजे गेल्या पंचवीस वर्षात दीपावलीने अक्षरशः शकडो कथा वाचकांना सादर केल्या आहेत त्यातल्या साऱ्याच कथांचे 'सटीक' विवेचन आजच्या काळाच्या व कथेच्या प्रगती-गतीच्या संदर्भात करण्याबाबतची! आणि तरीही ह्या मर्यादेत अमर्याद आनंद देऊन गेलेल्या कथांचा परामर्श घेण्याची ही कसरत मी करणार आहे (मात्र या परामर्षामध्ये 'विनोदी कथां'चा मी समावेश केलेला नाही. कारण विनोदी साहित्याचा परामर्श वेगळ्या लेखात घ्यावयाचा आहे.) 'दीपावली' वार्षिकाने गेल्या पंचवीस वर्षात ज्या अपेक्षा निर्माण केल्या व कायम राखल्या त्याची 'पसंतीची पावती' आजही 'महाराष्ट्र टाईम्स'च्या 'जनता कौला'च्या रूपाने मिळते आहे. वार्षिक निघाले तेव्हा हा 'नोंदणी' कौल नव्हता. पण 'खपाचा कौल' मिळतच होता. तेव्हा एखादा कौल देणारे पुस्तक एखादी प्रकाशन संस्था काढीत नव्हती. पण 'दीपावली'तल्या कथांची जे बिरूदे मिरवीत त्या त्या कथाकारांचे कथासंग्रह निघत होते. आजही ती परंपरा कायम आहे हे जेव्हा मी पाहतो तेव्हा 'दीपावली' नुसती (वयान) वाढली नाही तर दीपावलीने चांगल्या कथाही मराठीला दिल्या ह्याचा आनंद मनाला लाभतो.

## पहिल्या अंकापासूनचे मानकरी

१९४५ साली 'दीपावली' वार्षिकाचा पहिला अंक प्रसिद्ध झाला. तो काळ आगळा-वेगळा होता. स्वराज्य आलेले नव्हते. त्यामुळे त्या काळच्या वार्षिकात कथांबरोबरच विचारप्रवर्तक लेख, चर्चा इत्यादि गोष्टीनाही महत्त्व होते. त्यामुळे कथांना (वा कादंबऱ्यांना) आज जेवढे उधाण आलेले दिसते आहे तेवढे तेव्हा नव्हते. परंतु "दिवाळी अंक" म्हटला की, दिवाळीचा मूड, दिवाळीच्या सुट्ट्या व उत्सवी वातावरण ह्यामुळे कथांना तसे महत्त्व होतेच. 'नवकथे'चे





अनुक्रमणिका

वारे रुळलेले नव्हते. आणि त्या काळच्या 'नामवंता'ना दिवाळी अंकाचे 'खास' आमंत्रण हे तसे खास वाटावे असा तो काळ होता. त्यामुळे १९४५ सालच्या पहिल्याच अंकात वि. स. खांडेकर, प्रा. ना. सी. फडके, वोकील, माटे, य. गो. जोशी, चिं. वि. जोशी, ना. ह. आपटे, रघुवीर सामंत, प्रभाकर पाध्ये आदि मंडळींच्या कथा-साहित्याची हजेरी लागलेली दिसते. ह्यातली काही नावे काळाने गिळली असली व काहींचे कथालेखन जवळजवळ संपले असले तरी ही यादी त्या पहिल्या अंकातल्या साक्षेपी प्रयत्नांची नोंद ठेवून जातेच. ह्या अंकाची पाने चाळताना आणखी एक गोष्ट ध्यानी आली व आनंद झाला. पहिल्या अंकाशी जडलेले खांडेकरांचे नाते आजही कायम आहे. खांडेकरी कथा, रूपके, ललित निबंध ह्यांनी 'दीपावली' सजवली आहे. पहिल्या अंकातील कथा वाचताना आणखी एक गोष्ट ध्यानी आली ती अशी की, त्यातल्या कथाकारांची 'प्रकृती' स्पष्ट करणाऱ्या कथा 'दीपावली'ने सादर केल्या. प्रा. फडके (पार्वती), वोकील (माती), माटे (आमचा खंड्या), य. गो. जोशी ( वाहती गंगा ), चिं. वि. जोशी (कालिंदीची कहाणी), ना. ह. आपटे (पाव-आण्याचे पांडित्य) ह्या कथांचा ह्या संदर्भात उल्लेख करता येईल. पण ह्याहीपेक्षा आणखी एका गोष्टीकडे मला वाचकांचे लक्ष वेधा-यचे आहे. १९४५ साली श्री. पु. भा. भावे हे प्रामुख्याने 'पत्रकार' म्हणूनच महाराष्ट्राला अधिक परिचित होते. सावधान, आदेश, रक्त आणि अश्रु आदि गोष्टींचा दबदबा अधिक होता. त्यांनी काही कथा तोवर लिहिल्या होत्या, नाही असे नाही. परंतु 'कथाकार' म्हणून आजची कीरत त्यांना लाभलेली नव्हती. परंतु 'आदेश'कार भावे यांच्याकडून संपादकांनी साक्षेपाने 'कथा' मागितली आणि भावे यांनी **"सीमेवर"** ही कथा देऊन दीपावली–भावे 'समासा'ची सुरेख 'नांदी'च जणु नोंदविली. भावे यांच्या कथा साहित्यातल्या असीम यशाचीही नांदी 'सीमेवर' ह्या कथेने म्हटली. आणि 'बेस्ट ऑफ् भावे, वा भावे यांच्या उत्तम प्रणय कथा यांच्या संदर्भात 'सीमेवर' कथेचा उल्लेख वारंवार केला जातो ही गोष्ट पाहिली की, संपादक दलालांच्या साक्षेपी प्रयत्नाबद्दल कौतुक वाटते.

ह्या पहिल्या प्रयत्नानंतरच्या काळात दीपावली वार्षिकाने अनेक यशवंत, कीर्तीवंत लेखकांप्रमाणेच अनेक नवीन लेखकांनाही 'दीपावली'च्या माध्यमातून वाचकांप्रत पोहचविले आहे. नामवंतात श्री. वि. स. खांडेकर यांचा समावेश होतो. जनमानसातले त्यांचे स्थान हे अढळ राहिले आहे. राहणार आहे. त्यांची तरल कल्पकता, काव्यात्म वृत्ती, सालंकृत भाषा व जीवनातल्या मांगल्यावरील व सौंदर्यावरील त्यांची श्रद्धा ह्यामुळे खांडेकर आपला ठसा ठेवून आहेत. त्यांना बाह्यतः 'दिसणाऱ्या' मानवापेक्षा 'असणाऱ्या' मान-वाचे, त्याच्या मनातल्या सूक्ष्म तरल वेदनांचे आकर्षण आहे. त्यामुळे त्यांचे साहित्य जनसामान्यांना 'आपले' 'जवळचे' वाटते. खांडेकर यांनी रूपक कथांचा एक नवा प्रवाह प्रयत्नपूर्वक मराठीत आणून सोडलेला आहे. **दीपावलीत** त्यांनी गेल्या पंचवीस वर्षात जवळजवळ एकोणीस वेळा आपली उपस्थिती नोंदवली आहे. त्यातल्या कथांपैकी

**....नुसत्या कथा छापणे आणि साक्षेपाने काही प्रयत्न करणे यात पुष्कळच फरक आहे....असे प्रयत्न सफळ झाले म्हणजे कृतार्थता वाटते**

**आपण सारे खुनी आहो** (१९५०), **प्रवाह** (१९५२), **फत्तर** (१९५३), **ओलावा** (१९५४), **बद्धाची गोष्ट** (१९५७), **मुरली** (१९५८), **नवे नाटक** (१९६१) ह्या कथांचा खास उल्लेख करता येईल. रूपकांच्या माध्यमातूनही भाऊसाहेब अखेर जीवनाच्या जवळ जाण्याचाच प्रयत्न करतात. आघात, वैफल्य, तीन जगे, दोन मोसंबी, दोघे आदि रूपके ह्याची साक्ष देतील.

**खांडेकर** यांच्या इतका संबंध **प्रा. फडके** यांचा राहिलेला नसला तरीही त्यांनी **अभ्यंगस्नान** (१९४७), **पुरुष तेवढे सारे** (१९४९), **वर चढण्याची कला** (१९५२) ह्या चांगल्या कथा दीपावलीला दिल्या आहेत. '**अभ्यंगस्नान**' ही कथा मेनका प्रकाशनने नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या "शृंगारकथा" ह्या प्रातिनिधिक शृंगारकथा संग्रहात समाविष्ट करण्यात आलेली असल्याने 'फडके स्कूल'ची एक उत्तम कथा 'दीपावली'ने सादर केली ह्या गोष्टीचा दीपावलीला अभिमानच वाटावा.

**पं. महादेवशास्त्री जोशी** हे नाव आज मराठी कथा वाचकांच्या पुढे फारसे नाही. कारण आज शास्त्रीबोवांनी कथालेखन थांबवून एका मोठ्या कामाला हात घातलेला आहे. परंतु त्यांनी मराठीला काही चांगल्या कथा दिल्या आहेत ही गोष्ट मात्र काळाला (व वाच-कालाही) विसरता येणार नाही. "शास्त्रीबुवांकडे भीत भीत लेख मागितला. तेव्हा विचार करून ते म्हणाले "मी कथा देईन" ह्यावर रॉय किणीकर आश्चर्यचकित होऊन म्हणाले "कथा ?" त्यावर शास्त्रीबुवा आत्मविश्वासपूर्वक म्हणाले "होय, कथा देईन ! आणि शास्त्रीबुवांनी 'दीपावली'ला कथा दिली. आणि त्यानंतर त्यांनी भागी (१९४९), शेखर, मी चुकल्ये (१९५०), माजघराचे दार (१९५२), उंबरठा (१९५३), तो मला हवा आहे (१९५४) अशा सरस कथा दिल्या. माजघराचे दार, उंबरठा ह्या कथांचा खास 'तरल' कथा म्हणून उल्लेख करावा लागेल.

**'विभावरी शिरूरकर'** हे नाव असेच सर्वपरिचित. त्यांनी प्रारंभी प्रारंभीं दीपावलीला काही दीर्घकथाही दिल्या आहेत. त्यांचा परामर्श स्वतंत्रपणे घेतला जाणार असल्याने मी त्यांच्या शाप (१९५२), वेणू, समांतर रेषा व निरंजन ह्या कथांचा उल्लेख करतो. माणसाच्या मनातल्या व्यापारांचे सूक्ष्म चिंतन करून लेखन करणाऱ्या लेखिका म्हणून विभावरींची कीर्ती आहे. 'त्यांचा शाप' ह्या कथेत लग्नपूर्व संबंधातून होणाऱ्या अपत्यसंभवाच्या अनुषंगाने काही चर्चा-चिंतन आले आहे. समाजाविरुद्ध मनात उत्पन्न होणारी बंडखोरीची भावना व बंड करता येत नाही म्हणून येणारी अगतिकता. शेवटी समाज भीतीमुळे प्रेयसीपासून दूर राहिलेला प्रियकर तिला भेटतो, तेव्हा तो एक वेगळी दृष्टि तिला देतो. तो म्हणतो "पण समाजाच्या भीतीने स्त्रीला एकाकी सोडावं लागलं म्हणून प्रांजळ पुरुष मानसिक



अनुक्रमणिका

वेदनांनी शरपंजरी पडणं अशक्य नाही, याची तुला कल्पना येईल का?" पुरुषांना रडता येत नाही हा केवढा शाप आहे असे तिला वाटले – विभावरी शिरूरकर ह्या लेखिकेचा एक पिंड आहे. समाज-सेवा व समाजचिंतनातून तो घडलेला आहे ह्याची जाण तिच्या लेखनातून मिळते. दीपावलीला त्यांचे चांगले लेखन लाभले आहे.

## शृंगार कथांचे वादशाहा

आपल्या आगळ्या ढंगाच्या व वैशिष्टचपूर्ण शैलीच्या लेखनाने व कथालेखनाने ज्यानी 'दीपावली'चे शृंगारदालन सजवले अशा कथा लेखकात ज्यांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल अशा लेख-कात **कै. स. आ. जोगळेकर** यांचा समावेश होतो. जोगळेकरांइतका चौफेर वाचन केलेला, चिंतन-मननशील लेखकही विरळा आणि त्यांच्या सारखा ढंगदार शैलीने, समर्थ लेखणीने कथा लिहिणारा कथा लेखकही विरळाच म्हणावा लागेल. त्यांच्या अनुभवकथनातही जोश होता आणि अनुभवविश्वही वेधुंद करणारेच होते. त्यांची 'अहिल्या' ही मराठी कथेचे (शृंगार कथेचे) एक लेणे आहे. आणि 'शृंगार कथे'त (मेनका) तिचा समावेश अगदी फिट्ट बसतो. जोगळेकरांनी 'दीपावली'ला खऱ्याखुऱ्या, भरघोस, ठोस अशा शृंगार कथा दिल्या आहेत. अहिल्या, वारियाने कुंडल हाले, प्रवृत्ती रेषा भूतानाम्, यथा काष्टंच काष्टंच. ह्या त्यांच्या कथा मराठी रसिक वाचकांच्या दीर्घकाल स्मरणात राहतील. त्या कथांचे यश नेमके कशात आहे ह्याचा मी विचार करतो तेव्हा मला ते केवळ भाषा वा अभिव्यक्तीत आहे असे वाटत नाही (तसे काहीचे मत) अनुभवाची खोली, स्वयंभूत्व यात ते आहे असे मला वाटते. मुक्त अनुभव, मुक्त मनान जेव्हा शब्दांकित होतात तेव्हाच असे सामर्थ्य प्राप्त होते असे मला वाटते; त्यांच्या गाथासप्तशती, संकेत, श्यामला, शृंगार नायिका आदि लखांप्रमाणेच त्यांच्या संख्येने अल्प परंतु गुणांनी अतिशय खोल अशा वरील कथांचे मराठी साहित्यावरचे ऋण 'कथासाहित्य' व 'दीपावली' अभिमानाने मिरविणार आहे.

ज्येष्ठ पिढीतील श्रेष्ट लेखक म्हणून ज्यांचा काळाने सतत जयजयकारच केला अशा **कै. आचार्य अत्रे** ह्यांच्या अतिशय गाज-लेल्या **सार्वजनिक जीवन** (१९५०) ह्या कथेनेही दीपावली भूषविली आहे ही गोष्टही साभिमान नमूद करायला हवी. आचार्य अत्रे यांनी साहित्याच्या सर्वच दालनात आपल्या वैशिष्टचपूर्ण शैलीने आपल्या पाऊलखुणा उमटविल्या आहेत. सार्वजनिक जीवन ह्या कथेत त्यांची खेळकर, उपरोधिक, बोचरी शैली व त्यांचे सूक्ष्म अवलोकन यांचा प्रत्यय येतो.

प्रारंभीच्या काळात, त्या काळी विशेष लोकप्रिय असलेल्या **श्री. प्रभाकर पाध्ये** (त्याची तिसरी वायको–१९४५ व आगगाडीचे रूळ–१९४९), **प्रा. रा. भि. जोशी** (सदर बाजार–१९४९), **ना. ग. गोरे** (कृष्णेचा डोह–१९४९), **शामराव ओक** (निभाव–१९५०), यांच्याही कथा 'दीपावली'चे कथा-दालन भूषवून गेल्या. कवि म्हणून अधिक लोकप्रिय असलेल्या **सोपानदेव चौधरी** यांनी १९५० साली दीपावलीत कथा लिहिली (दोन कटोरे) तर लोक कवि **मनमोहन** यांनी "तेलाच्या वाटलीतील माणूस" (पण कळकट, तेलकट नव्हे) दीपावलीच्या वाचकांना दाखविला. **प्रा. गंगाधर गाडगीळ** ही १९४९ साली दीपावलीच्या वाचकांना त्यांच्या खास शैलीचा अवि-ष्कार करणारी "शाईचा ठिपका" ही कथा देऊन गेले. **प्रा. प्रभाकर तामणे, माधव मनोहर, रघुवीर सामंत, वसंत कानेटकर, ग. ल. ठोकळ, लक्ष्मणराव सरदेसाई, उद्यावरकर** ही काही नवी जुनी मंडळीही दीपावलीच्या कथा-दालनात काही अनवट राग आळवून गेली–काहीनी एक तर काहीनी दोन! काहींनी चार चार रागही दिलखुलासपणे पेश केले.

## भावे आणि भाग्ययोग

पण 'दीपावली'च्या ह्या पंचवीस वर्षाच्या कथांच्या वाटचाली-तला ज्यांचा वाटा फार मोठा आहे अशा कथा लेखकात **श्री. पु. भा. भावे** यांचा समावेश होतो. 'दीपावली'ने भाव्यांना कथालेखक केले वगैरे काही म्हणत नाही. परंतु भावे-दलाल संबंधावावत मी खात्रीने म्हणू शकेन की, भावे यांच्या लेखणीची सारी ताकद त्यांच्या एका प्रत्ययकारी कथेतून जाणून घेऊन दलालांनी त्यांना 'कथा हवी' असा सतत आग्रह केला व भावे यांनी तो सतत मानला. गेल्या पंच-वीस वर्षात 'दीपावली'च्या जवळजवळ प्रत्येक दिवाळी अंकात भावे आहेत. आणि ह्या काळात भावे यांनी त्यांच्या उत्कृष्ट कथा 'दीपावली'ला दिल्या आहेत. एखाद्या कथाकाराचे सारे उत्तम एखाद्या मासिकाच्या वाटचाला यावे हा त्या मासिकाच्या व एकूण साहित्याच्या दृष्टीनही भाग्ययोगच म्हटला पाहिजे. भावे यांच्या दीपावलीत आलेल्या कथांची नुसती नांवेच वाचा. **सोमेवर** (१९४५), **सतरावे वर्ष** (१९४६), **खिडकी** (१९४७), **सावल्या-मादाम पिशी** (लघु कादंबरी) (१९४८), **अकुलीना** (लघु कादंबरी) (१९४९), **झोका** (१९५१), **उत्तर** (१९५२), **मूर्ख माणूस** (१९५३), **दुःख** (१९५४), **देव्हारा** (१९५५), **कुभांड** (१९५६), **प्रश्न** (१९५७), **सुरेखा** (१९५८), **किल्मिष** (१९६१), **आला क्षण गेला क्षण** (१९६३) **हिमानी** (१९६४), **शिरीन** (१९६५), **स्पर्श** (१९६६), **भेट**, (१९६७), **झडप** (१९६८). ह्यापैकी सावल्या-मादाम पिशी, सतरावे वर्ष, अकुलीना, कुभांड, देव्हारा, आला क्षण गेला क्षण, हिमानी ह्या नांवाने पुस्तके निघाली तर **'बेस्ट ऑफ् भावे'** ह्या पुस्तकाच्या पहिल्या भागात ह्यातील **सतरावे वर्ष** ह्या कथेचा समावेश झाला. दुसऱ्या भागात **सोमेवर, दुःख** ह्या दोन कथांचा समावेश झाला आहे. त्यातल्या आणखीही काही कथा 'दीपावली' मासिकातून येऊन गेल्या आहेत. **मादाम पिशी** ह्या लघु कादंबरीवर **'स्वामिनी'** हे नाटक झाले. तर **अकुलीना** ह्या लघु कादंबरीवर **'माझा होशिल का?'** हा चित्रपट निघाला. भावे यांच्या ह्या साऱ्या कथातले अनु-भवविश्व अगदी आगळे वेगळे आहे. भावे जसे कलाकार आहेत तसेच ते ध्येयवादी प्रचारकही आहेत. मूल्ये मानणारे व त्यासाठी मोल मोजणारेही आहेत. भाव्यांच्या मानतल्या श्रेष्ठ चिंतकाचा








प्रत्यय त्यांच्या ध्यास, मुक्ति ह्या कथेप्रमाणेच **'आला क्षण'**मध्येही येतो, तर दुःख, देव्हारा, उत्तर, हिमानी, झडप ह्या कथांतून आपल्याला अंतर्मुख व्हायला लावणारे भावे दिसतात. सतरावे वर्ष, झोका, किल्मिष, स्पर्श, भेट ह्या कथांतून मानवी मनाची विविध स्पंदने आपल्याला जाणवतात. सीमेवर, सावल्या ह्या कथा भाव्यांच्या लेखणीतल्या हळुवारपणाचा, सुभगतेचा प्रत्यय देतात आणि एक घणाघाती, समर्थ लेखणी किती हळुवार बनू शकते ह्याचा प्रत्यय देतात. "सुरेखा" ह्या कथेतला अनुभव तर लेखकाप्रमाणेच आपल्यालाही हलवून सोडतो.

पु. भा. भावे यांच्या प्रमाणेच ज्यांच्या चांगल्या कथांचा दीर्घकाळ लाभ दीपावलीला झाला आहे अशा लेखकात श्री. **अरविंद गोखले** यांचा समावेश होतो. मराठी कथाकारात नवकथाकार म्हणून जी नावे घेतली जातात त्यात भावे, गोखले, गाडगीळ, माडगुळकर ह्या चारही जणांनी जरी 'दीपावली'त आपली उपस्थिति नोंदविली असली तरीही भावे-गोखले हे अधिक नियमित आहेत असेच म्हणावे लागेल. गोखले हे नवकथाकार म्हणून मानले गेले असले तरीही त्यांच्या कथेतली 'कथा' वा 'गोष्ट' कायम आहे. मनाची स्पंदने आहेत पण गुंता कमी. त्यांच कथाविश्व काही आगळ्या चेहऱ्यामोहऱ्याच्या माणसांचे आहे. 'सर्वसाधारणा'ची कथा होत नाही. 'युनिक' असे काही दिसले-भासले-भावले की, कथाकाराचे डोके गरगरायला लागते. अरविंद गोखले यांनी दीपावलीला दिलेल्या कथात **नकार**, (१९५४) **अविधवा** (१९५५), **उजळलेली दीपमाळ** (१९५६), **भूकंप** (१९५९), **कॅक्टस** (१९६०), **उभा जन्म उन्हात** (१९६१), **शपय** (१९६३), **अनवाणी आत्मा** (१९६४), **मुक्ता** (१९६५), **मुसळधार** (१९६६), **अभिसारिका** (१९६७), **सूर्यमुखी** (१९६८), ह्यापूर्वी १९४९ साली त्यांनी "सा–सा" ही कथा दीपावलीला दिलेली दिसते. परंतु वरील कथांपैकी अविधवा ह्या कथेवर **'माझे घर', माझी माणसे'** हा चित्रपट निघाला ! **'उभा जन्म उन्हात'**वर नाटक झाले. विघ्नहर्ता मुसळधार व सूर्यमुखी ह्या नावाचे संग्रह निघाले. ह्या साऱ्या कथातले अनुभवविश्व खरोखरच इतके आगळे वेगळे आहे–समर्थ आहे की, त्याचा मनावर होणारा परिणाम फार मोठा आहे. त्यांची 'अविधवा' ही कथा वाचून झाल्यावर व परवा पुन्हा वाचल्यावर मन गलवलले. 'उभा जन्म उन्हात'चा नायकही मन हलवून सोडतो. 'मुसळधार'ची एक पाय गमावून बसलेली नायिका व त्या कथेची अखेर अशीच अस्वस्थ करून जाते. 'मुक्ता' ह्या कथेतली घटस्फोटित स्त्री नवरा परत गावात आल्यावर भेटायला जाते, त्या बाबतीतली तिच्या मनाची आंदोलने गोखले फार समर्थपणे मांडून जातात. 'कॅक्टस' ही कथा १९६० सालीही खूप गाजली. आजही त्यातले अनुभवविश्व 'खोल' असल्याचा प्रत्यय यतो. "सूर्यमुखी" ह्या गेल्या वर्षीच्या त्यांच्या कथेतला धीर देणारा स. सेवक संपादक व धीर घेत जगू पाहणारी पण तो नंतर सुटलेली नायिका यांचे चित्रण असेच मनोज्ञ आहे.

तिसरे लेखक आहेत **प्रा. वामन चोरघडे** ! चोरघडे यांची मराठी कथेतली कामगिरी वैशिष्टयपूर्ण आहे ह्याची नोंद काळानेच घेतली आहे. नवकथा हा शब्दही जेव्हा रूढ नव्हता, तेव्हा चोरघडे अगदी नव्या चेहऱ्यामोहऱ्याची कथा लिहीत होते. **दीपावलीत** चोरघडे यांच्या शहाण्याने घातला उखाणा (१९६१) जोहार (१९६३) मनस्विनी (१९६४) ख्याल (१९६५) सुवास (१९६६) अंगे भिजली जलधारांनी (१९६७) ह्या कथा प्रसिद्ध झाल्या. चोरघडे यांच्या कथेची 'शब्दकथा' देखणी, सुभग असते. रचनासौष्ठव हा त्यांच्या कथेचा विशेष, काव्यात्म, हळुवार मन ही त्यांना लाभलेली देणगी त्यामुळे त्यांच्या कथा आगळ्या वाटत आलेल्या आहेत. ख्याल, सुवास, अंगे भिजली जलधारांनी, जोहार ह्या साऱ्याच कथा त्यांच्या निवडक व चांगल्या कथात मोडतील. 'सुवास' कथेतले तर उतारे देण्याचा मोह होतो पण तो टाळतो.

'दीपावली'चे एक कुटुंबीय लेखक म्हणून श्री. **अच्युत बर्वे** यांचा उल्लेख करायला हवा. बर्वे यांनी अनेक कथा लिहिल्या. संग्रहही निघाले. परंतु पंचवीस वर्षांच्या वाटचालीत त्यांनी दीपावलीला बाराचे वर कथा दिल्या. त्यातल्या **विडा न रंगे कातांविणं, हुंदका, चंदनाचा उंबरठा, नर, धार, बकुळीचे निर्माल्य, पाठमोरी, सोता,** ह्या कथांचा खास करून उल्लेख करायला हवा. **'पाठमोरी'** ही त्यांची अलिकडची (१९६७) कथा तर बर्वे यांनी कमावलेल्या ताकदीची कल्पना देते. मनाचे फार नाजुक अनुबंध बर्वे फार तरलतेने टिपतात आणि तितक्याच तरलतेने मांडतात. आणि हळवे न होता, अलिप्ततेने मांडताना दिसतात. 'चंदनाचा उंबरठा' ही कथा तर मनात घर करून आहे. गरीब पण गुणी नवरा आणि त्याचा गॅरेजमधला संसार हीच आपली 'अमरपुरी' असल्याचा साक्षात्कार घेऊन घरी परतणारी नायिका ही वाचकाला अंतर्मुख करून जाते. बर्वे हे नुसते हलक्या फुलक्या व विवाहबाह्य संबंधांच्या चटोर प्रणयकथा रंगवणारे लेखक आहेत हा अपसमज त्यांच्या हुंदका, चंदनाचा उंबरठा, पाठमोरी, नर, धार ह्या कथा वाचून नाहीसा होईल.

अच्युत बर्वे यांच्या प्रमाणेच **व्यंकटेश माडगुळकर** यांच्या **बाजारची वाट** (१९५६) **घरापाठीमागची लोमा** (१९५७) ह्या माडगुळकरी पठडीतल्या गोष्टींचा उल्लेख करायला हवा. श्री. **द. मा. मिरासदार** ह्यांच्या **व्यंकूची शिकवणी व निरोप** ह्या दोन्हीही तुफान गाजलेल्या कथा दीपावलीने १९५६–५७ साली वाचकांना दिल्या ही



अनुक्रमणिका






गोष्ट साभिमान नमूद करता येईल. **विजय तेंडुलकर** यांच्या **समस्या, द्वंद्व, मित्रा** सारख्या कथाही दीपावलीने वाचकांना दिल्या. 'मित्रा' ह्या कथेतले अनुभवविश्व सर्वस्व आगळे व समर्थ होते. त्यातली समस्या व त्यातले मानसशास्त्र ह्याचा फार समर्थ आविष्कार तेंडुलकरांनी केला आहे.

## खास 'दीपावली'ची निर्मिती

'दीपावली'च्या कथांचा हा परामर्ष घेताना ज्या सुजाण व साक्षेपी प्रयत्नांचा खास उल्लेख करायला हवा त्या प्रयत्नांचे नाव आहे कथाकार गोपाळ कृष्ण भोवे ! गोपाळ कृष्ण भोवे—कथाकार भोवे ही मात्र खास दीपावलीची निर्मिती आहे. भोवे हे संगीत रसिक होते आणि संगीताच्या दरबारी 'किस्से' बहुत घडतात. त्यात भोवे मनमोकळ्या स्वभावाचे, गोष्टीवेल्हाळ ! त्यामुळे त्यांना 'कथा' भरपूर मिळाल्या. टिपल्या हे त्यांचे वैशिष्ट्य ! त्यांच्या कथांना एक आगळ्या वातावरणाची पार्श्वभूमी लाभली आहे. त्यांचा त्यांनी चांगला उपयोग केला आहे. 'दर्द' असेल तर सूर अधिक 'मधाळ' होतात असे म्हणतात. संगीताच्या क्षेत्रातील ही दर्द, हे तप, ही आगळी माणसे भोवे यांनी टिपली आहेत. काहीतरी चोरण्याचा नियम पाळणारा तबलजी, ज्याला मनोमन वरले त्याच्यासाठी त्या दिवशी समुद्र किनाऱ्यावर जाऊन परतणाऱ्या होड्यांच्या साक्षीने 'सोमवार'चा उपवास सोडणारी व्रतस्थ सीमंतिनी, इजाफा मंजिलमध्ये **'कित गयो बावरी बना'** ही ठुमरी ऐकवणारी आणि तबलजी वेनीलालवर जीव ओवाळून टाकणारी चाँद, वायाक्का ह्या साऱ्या कथा तुम्हाला एका वेगळ्याच विश्वात घेऊन जतात. भोवे यांच्या प्रमाणेच **रणजित देसाई** यांची तानसेन पुत्र विलासखान याच्या जीवनावरील **"कौन भ्रम ऽ भूले"** ही (१९६०) कथा, **जितेंद्र अभिषेकी** यांच्या **भ्याड, अनजाणा** ह्या कथा त्याच पार्श्वभूमीवरील गाजलेल्या कथा म्हणून नमूद करता येतील. **रणजित देसाई** ह्यांच्या **अभोगी, प्रपात** ह्या कथांचाही गौरवपूर्ण उल्लेख करायला हवा. सुरुवातीच्या काही वर्षात श्री. **वि. वा. शिरवाडकर** यांनी सर्कस, तंबोऱ्याची तार, निर्णय या कथा दिल्या. **विजया राजाध्यक्ष** यांनीही आठ दहा अंक भूपिवले. **पु. ल. देशपांडे** यांचा **अंतू बरवा, बबडू** हेही दीपावलीच्या दारातूनच मराठी वाचकांना भेटले.

## कोणाचीही मिरास नाही

आणि तरीही कथाविपयक कामगिरी संपत नाही. 'दीपावली'चा दिवाळी अंक हा नामवंतांच्या उत्तम साहित्याने नटलेला असला तरी तो केवळ नामवंतांची (च) मिरास कधी नव्हती व नाही. साहित्यातले नवेजुने जसे दीपावलीने कधी मानलेले दिसत नाही तसेच साहित्यिकातलेही नवेजुने मानले नाही ह्याचा भरपूर पुरावा 'दीपावली'च्या दिवाळी अंकातून मिळतो. नामवंत हेही कधीतरी नवे होतेच. साहित्यातले जे चांगले आहे ते कधी जुने होत नाही. आणि आजचे नवे सारे चांगलेच असते असा दावाही दीपावली करीत नाही. त्यामुळेच इथे खांडेकरांच्या पंक्तीला जसे भावे, गोखले बसतात तसेच त्या काळातले 'नव' नवे **सदानंद रेगे**ही बसले व आजचे "अति नव नवे" (ही विरूदे मी वापरली आहेत. दीपावलीची ती नाहीत) **दिलीप चित्रे** हेही बसले. 'दीपावली'त जसे **चोरघडे** बसले तसेच **रा. रं. बोराडे**ही बसले, चित्रकार द. ग. गोडसे यांच्या **इतिहास-कथा** (शिधोजीचं हसणं—१९६८) बसल्या तशाच त्या **अरविंद ताटके** यांच्याही बसल्या (**जखम**-सलीम-अनारकली व **प्राक्तन** बाज-बहादुर रूपमती) **ज्ञानेश्वरी नाडकर्णी** (लाक्षागृह—१९६८) **मधु मंगेश कर्णिक** (सिनिक १९६८), **मा. कृ. पारधी** (रागिणी १९६४) **वि. वा. पत्की** (आघात १९६४) ह्या लेखकानीही दीपावलीला चांगल्या कथा दिल्या आहेत. **सदानंद रेगे** यांच्या **चंद्र सावली कोरतो** व **मासा** व दिलीप चित्रे यांच्या मेथिड्रिन ह्या कथांचा उल्लेख करायलाच हवा. **सिनिक्** (दा. गो. देशपांडे) ह्यांच्या कथांचा 'दीपावली'च्या संदर्भात खास उल्लेख करायला हवा. 'सिनिक्' यांच्या लेखनाचे बाह्य आणि अंतरस्वरूप हे खास त्यांचे, त्यांनी संपादिलेले आहे. अतिशय लहान पण अतिशय तरल व सूक्ष्म अनुभव 'क्षणां'चे ते चित्रण असते. 'प्रीति' वा 'स्त्री पुरुष' हा त्यांचा आत्मा असतो. ह्या मर्यादितसुद्धा त्यांनी इतके विपुल व विविधतापूर्ण लिहिले आहे की सिनिक कथा, सिनिक्था असे कथासंग्रह निघू शकले आहेत. 'सिनिक्' यांच्या कथांनी दीपावलीच्या माध्यमातून मराठी कथेत एक वैशिष्टपूर्ण भर घातली आहे असे म्हटले तर त्यात यत्किंचितही अतिशयोक्ती झाली असे होणार नाही. श्री. **पद्माकर गोवईकर** हे नावही खास दीपावलीचे म्हणून नमूद करता येण्यासारखे आहे. गोवईकर यांच्या लेखनाला विनोदाचेही एक अंग आहे. आणि विनोदी साहित्याचा आढावा घेताना त्यांच्या कला-कर्तृत्वाचा वेगळा परामर्श घेतला जाणार असला तरी विनोदी नसलेल्याही काही कथा त्यांनी 'दीपावली'त लिहिल्या आहेत. **श्रीराम कामत, वसंत फेणे, प्र. श्री. नेरुरकर, सुरेश वेंगुर्लेकर, ना. व्यं. देशपांडे, य. दि. फडके, आरती उद्यावरकर, मनोहर तल्हार,** डॉ. **सरोजिनी वावर, वसंत पु. काळे, प्रभाकर अत्रे** ह्या नव्या नावांनाही 'दीपावली'च्या दिवाळी अंकातून वैशिष्टचपूर्ण स्थान गेल्या काही वर्षात दिले गेले आहे. श्रीराम कामत ह्यांनी तर **'भीष्माचा डोंगर'** ही कादंबरीही दीपावलीच्या वाचकांना नंतर सादर केली आहे. कामत ह्यांच्या कथालेखनाला विविध स्तर आहेत. नागर, ग्रामीण, विनोदी, उपहासगर्भ अशा अनेक प्रकारांनी ते लिहितात. डॉ. सरोजिनी वावर ह्यांचे कथालेखन त्यांच्या संशोधनाच्या अनुषंगाने चालते. आणि स्वतःच्या आगळ्या वैशिष्टचाने व अनुभवाच्या सच्चाईने ते त्या त्या मर्यादेत का होईना यश संपादन करते. **सुरेश वेंगुर्लेकर** हे तसे नवेच नाव. पण दीपावलीला त्यानी फार रसीलया व समर्थ कथा दिल्या आहेत. **मनोहर तल्हार** ह्यांनी १९६७ च्या अंकात **"एक आँख का पंछी"** लिहिली आणि एका वेगळ्याच जगाचा परिचय करून दिला. जीवनाच्या बहुरंगी व बहुढंगी स्वरूपाची जाण असल्याने संपादकांनी ती कथा—चाकोरीबाहेरची असूनही—छापली.

ना. व्यं. देशपांडे यांची **थरार** (१९६७) हीही कथा अशीच आहे–चाकोरीबाहेरची ! दिलीप चित्रे याची 'मेथिड्रिन'ही कथाही कथेविषयीच्या रूढ कल्पनांना धक्के देणारी आहे. **प्रभाकर अत्रे** ह्यांच्या **नातं** (१९६४) **कधी बहर, कधी शिशिर** (१९६५) व **तेचि पुरुष दैवाचे** (१९६८) ह्या कथा दीपावलीच्या दिवाळी अंकांतून प्रसिद्ध झाल्या. ह्यातल्या 'नातं' ह्या कथेतले कथाबीज मुख्यतः मानसशास्त्रीय असे होते. विवाहपूर्व संबंधापासून झालेला व टाकून दिलेला मुलगा हा विवाहोत्तर झालेल्या मुलाच्या मुंजीच्या दिवशी त्या मातेला 'स्मृतिरूप' भेटतो आणि कसा अस्वस्थ करून सोडतो ह्याची कथा त्यात आहे. तर 'तेचि पुरुष दैवाचे'मध्ये परिस्थितीवश दुर्विलास सोसणाऱ्या एका नटश्रेष्ठाची वेदना बोलकी करण्याचा व त्याचे कलेचे इमान पडताळून पाहणाऱ्या प्रसंगात 'इमान' टिकते हे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्या कथेला वयोज्येष्ठ व श्रेष्ठ कलाकार केशवराव दाते यांची 'दाद' मिळाली ही एकच गोष्ट स्वाभिमान नमूद करतो (तरीही क्षमस्व !!) डॉ. **कु. दमयंती सरपटवार** यांच्या कथांचा परामर्श मी ह्यात हेतुपूर्वक घेतला नाही. कारण त्यांच्या सर्वच कथांचा आशय तसा गंभीर असला-नसला तरीही त्यांची शैलीही खास मिष्किल, उपरोधपूर्ण व विनोदाला जवळचीच आहे. विनोदी साहित्य-परामर्षात त्याचा अंतर्भाव होईलच.

ह्याशिवाय सौ. वसुंधरा पटवर्धन यांची 'जप्ती' (१९५९) जी. ए. कुलकर्णी यांच्या 'रात्र झाली गोकुळी (५९) राक्षस (६०) वाधा (६१) शरच्चंद्र चिरमुले यांची नवस (१९६७) ह्या कथांचा उल्लेख करायला हवा. कथाकार–कवियित्री म्हणून सौ. शिरीष पै व लेखक-दिग्दर्शक मधुकर गोपाळ पाठक यांचाही दीपावलीशी संबंध आला. त्यांच्या कथांचे व सहकार्याचे स्मरण ह्या निमित्ताने करणे उचितच ठरेल.

दीपावलीने मराठी कथेला नेमके काय दिले ? 'बेस्ट ऑफ् दीपावली' जर संपादित करायची झाली व त्यात कथेचा विभाग निवडायला सांगितला तर किती कथा उरतील ! हे करताना 'तर-तम' होईल. वैयक्तिक आवडीनिवडीही येतील. पण हे करताना त्यांना दीपावलीतील खांडेकर, भावे, गोखले, तेंडुलकर, चोरघडे, जी. ए. कुलकर्णी, वसुंधरा पटवर्धन, स. आ. जोगळेकर, अच्युत बर्वे, डॉ. कु. सरपटवार, गोवईकर, जयवंत दळवी, मिरासदार, भोवे, रणजित देसाई, सदानंद रेगे, जितेंद्र अभिषेकी, द. ग. गोडसे, ताटके ह्या नावांचा विचार करावाच लागेल. इतके कथांचे दालन दीपावलीने समृद्ध केले आहे. जीवनाच्या विविधांगांचा आविष्कार गेल्या पंचवीस वर्षांत घडविला आहे आणि त्याहून महत्त्वाचे म्हणजे घडवीत असताना कोठेही वात थरथरू दिली नाही. स्थान सोडले नाही. निष्ठा फिरविल्या नाहीत. कलेप्रमाणेच कथेबाबतही इमान राखले. कथांना 'स्वातंत्र्य' दिले पण स्वातंत्र्य म्हणजे स्वैराचार नव्हे ही सुजाण जाण दीपावलीच्या कथांनी राखली. पातळी सोडली नाही. जीवन जसे एकरंगी असत नाही, तशीच दीपावलीची कथाही एकरंगी नाही. तिला कुंपणे नाहीत नाहीत. पण तरीही मर्यादा कळतात. तिला शृंगार चालतो, आवडतो, तसेच तिला 'सती'ही आवडतात. तिला संगीताचे वेड आहे. कलांचा व्यास आहे. जीवनातल्या घात–अपघातांची कदर आहे. नियतीची क्रूर व रम्य चेष्टितेही तिने आविष्कृत केली आहेत. मनामनांचे कानोसे तिने घेतले आहेत आणि त्यातल्या 'विविध' नमुन्यांचा आनंद वाचकांना दिला आहे. नागर आणि खेडुत यांचीही जीवने तिने रंगविली आहेत. तोडी देणारा विलासखान दिला आहे आणि 'सती' राधाही दिली आहे. अशी विविधांगाने विनटलेली, अनुभव संपन्न, आशयघन, नृत्य गान-निपुण कलावती कथा दीपावलीने मराठी वाचकांना गेल्या २५ वर्षांत दिली आहे. मैफल सजत आली आहे. उणे कधी पडलेच नाही. 'दीपावली'च्या दरबारात कथेला व कलेला वाव आहे हे ठाऊक असल्यानेच साहित्य–कला–संस्कृति संगम साधला आहे. त्या संगमावर उभा राहून मीही दीपावलीला सुयश चिंतितो व म्हणतो 'शुभास्ते' पंथानः !!

* * *










# टीपणी

## सत्याचा शोध

आचार्य अत्रे जन्मभर गाजत-गर्जत राहिले. आणि त्यांच्या आकस्मिक मृत्यूने धक्का खाल्लेली माणसे अजूनही साव-रली आहेत असे वाटत नाही. अत्रे 'धक्का-तंत्रा'त तसे पारंगतच होते. मृत्यूपूर्वी त्यांनी अनेकांना अनेक धक्के दिले. मग मृत्यूचा दिला. त्यानंतर मृत्युपत्राचाही धक्काच मिळाला. अत्रे यांच्या मृत्यु-पत्राने आत्रेय दातृत्वाचा जणु हिमालय उभा केला. पंडित नेहरूंसकट अनेकांच्या मृत्युपत्राशी त्या मृत्युपत्राची तुलनाही केली गेली. मग लाखाचे आकडे आकसू लागले. शिवशक्ति 'गहाण' असल्याची वार्ता आली. अत्रे यांच्या जीवनातला एक महत्त्वाचा भाग व्यापून उरलेली एक अभिनेत्री पुढे आली आणि तिनेही काही 'देणे घेणे' काढले. आणि शिरीष-व्यंकटेश पैंनी घेतलेल्या भूमिकेने प्रथम त्या 'पत्रा'च्या या अस्सलपणाबद्दल शंका उत्पन्न झाली. पण सौ. सुधा अत्रे व अन्य नातेवाईकांनी ग्वाही दिल्याने पुन्हा ते प्रकरण शमणार असे दिसू लागले होते. पण तसे घडले नाही. 'अज्ञात' इसम म्हणजे (कॉ.) विना-यक भावे हा शोध लागला. शिवाजी-पार्कच्या सभेत, सभेचे उद्दिष्ट विसरून कॉ. डांगे यांनी केलेल्या 'त्या' प्रकरणीच्या वक्तव्यामुळे व वापरलेल्या भाषेमुळे एक नवे 'इंधन'च लाभले. श्री. वामनराव वर्दे व ना. बाळासाहेब देसाई ह्या विश्वस्तांनी त्यागपत्र दिल्याने व दुसरे दोन विश्वस्त हे 'विश्वसनीय' कम्युनिस्ट म्हणून परिचित असल्याने ह्या सर्वच प्रकरणाला आता एक आगळाच रंग चढत चालला आहे. इतरही आचार्यांनी मिळविलेला पैसा हा त्यांच्या संपन्न अशा वाङ्मयीन व वृत्तपत्रीय कर्तृत्वाचा भाग होता व त्याचा विनियोग कसा व्हावा हे ठरविण्याचे संपूर्ण स्वातं-त्र्यही त्यांना होते. त्या विषयात 'पब्लिक' खरं तर येत नाही, येऊ शकत नाही. परंतु आचार्य अत्रे ही एक 'प्रल्हाद केशव अत्रे' नामक व्यक्ति नव्हती तर ती 'आचार्य अत्रे' नामक सामाजिक, राजकीय, साहित्यिक संस्था होती. 'मराठा' उभा करताना अनेक सामान्य माणसे व काही महाराष्ट्राभिमानी महामनस्क माणसे 'मराठा'च्या पाठीशी उभी राहिली. ते करताना 'आचार्य अत्रे' या नावांबद्दलची व त्यासाठी उभ्या राहिलेल्या कार्यकर्तृत्वाची जाण होती. श्रद्धा होती. अशा माणसाच्या 'मृत्युपत्रा'ने एक 'वादळ' उत्पन्न व्हावे व 'वादंग' माजावे ह्याचा मराठी माणसांना खेद होतो. विशेषतः कॉ. डांगे यांच्या शिवाजीपार्कच्या वक्तव्याने व परिभाषेने मराठी जनमानसात शंकेचे रान उठवले आहे. भावे-डांगे आदि मंडळींनी ज्या पद्ध-तीने ते 'गूढ' वाढवीत नेले आहे, त्यामुळेच केवळ ह्या वादात काही लिहिणे भाग पडत आहे. मृत्युपत्राची भाषा (इंग्रजी) व परिभाषा अनेक 'आत्रेय' मित्रसुहृदांना सुद्धा संशयास्पद वाटते. ते सारे संशय खरे असतील-नसतीलही. पण जर हे मृत्युपत्र अधिकृत असेल तर त्याबाबत निर्माण झालेल्या ह्या वादळामागची भावना ध्यानी घेऊन राज्य शासनाने ह्यात लक्ष घालावे असे आता वाटू लागले आहे. "ह्या मागे काही 'लाल' डाव तर नाही ना ?" ह्या शंकेने आज मराठी मन त्रस्त झाले आहे अशा वेळी शासन केवळ त्रय-स्थाची वा बघ्याची भूमिका घेऊ शकत नाही. ह्या मृत्युपत्राची अधिकृतता सिद्ध होईपर्यंत मराठी माणूस स्वस्थ बसेलसे दिसत नाही. अत्रे हा जसा एक त्याचा 'श्रद्धेय' विषय होता तसाच हे 'मृत्युपत्र' हाही एक 'श्रद्धे'चा विषय बनला आहे. आत्रेय 'दातृत्व' खरे ठरावे असे त्याला वाटते. पण त्या 'दातृत्वाला' लाल (वा कुठलाच) राजकारणी रंग नसावा असेही त्याला मनोमन वाटते. किती लाख मिळणार ह्यालाही तादृश कमी महत्त्व आहे. जे 'महाराष्ट्र चरणी' रुजू व्हायचे ते सरळ 'महाराष्ट्र चरणी'(च) रुजू व्हावे असे त्याला वाटते. त्याने अत्रे वा मरा-ठ्याला जे दिले ते त्यांना व त्यांचे (न्याय्य) वाटले म्हणून दिले आहे. ती अन्ये कुणाची कृपा म्हणून केली गेलेली गोष्ट नव्हती. 'वर्दे-देसाई' 'राजिनाम्या'मुळे हे नेमके घडेल की नाही ह्याबद्दल आता मराठी माणसाला संशय वाटतो. आणि हे संशय-पिशाच्च उभे रहावे असेच वर्तन (कळत-नकळत असेल) डांगे-भावे आणि कंप-नीच्या हातून घडले आहे. (ते पाकीट जर विनायक भावे यांनीच दिले होते तर कुणा 'अज्ञात' इसमाची हवा कां निर्माण करण्यात आली ? "आम्हाला कुणी विचा-रलेच नाही" हा खुलासा काही विश्वास निर्माण करणारा ठरत नाही) तेव्हा ह्या 'गाजल्या' मृत्युपत्राबाबतच्या प्रकरणी शासनाने, अत्रे यांच्या कुटुंबीयांनी, विश्वस-नीय मित्रसुहृदांनी (पोतदार, सोपान-देव आदि) अधिक लक्ष घालावे व संश-याचे वातावरण नाहीसे करून 'मराठा' व अन्य 'आत्रेय' गोष्टींना न्याय मिळवून द्यावा. ती एक 'सामाजिक' गरज आहे असे वाटते.

## "विद्युत्प्रवाही" राजकारण

'बंगलोर'च्या वाजत्या गाजत्या कॉंग्रेस अधिवेशनानंतरच्या काळात ह्या देशाच्या राजकारणाचे 'विद्युतीकरण'च जणु झाले आहे. इतके की त्या विद्युत् दाबा-मुळे ह्या देशाची स्थिरता, ऐक्य, लोक-शाही संकेत, कॉंग्रेस शासन व संघटना ह्या गोष्टी उडून तर जाणार नाहीत ना अशीही भीति वाटू लागली आहे. पंडितजींना जसे



अनुक्रमणिका





"आपण पंतप्रधानापेक्षाही अधिक काही तरी आहोत" असे वाटत असे तसेच पंडित पुत्री इंदिरा गांधी यांनाही वाटू लागलेले आहे की काय अशीही शंका मनात उत्पन्न व्हावी अशा गतीने व पद्धतीने त्या वागत आहेतसे दिसते. देशातली गरीबगुरीब जनता हा आपल्या फार फार (म्हणजे फारच) जिव्हाळ्याचा झाल्याचा एक 'हिस्टेरिक' साक्षात्कार त्यांना झाला असून त्यासाठी त्यांच्या दारी रोज रोज धावत येणाऱ्या मंडळींना "तुमच्यासाठी पहा मला किती किती वाटते ! पण मोरारजीच सारखे आडवे येत" असा आभास उत्पन्न करीत वक्तव्ये सुनावीत आहेत. आव्हाने देत आहेत. सामर्थ्याची कसोटी पाहण्याचीही आपली तयारी असल्याचे सुनावीत आहेत. "राष्ट्रीयीकरण" ही 'सोनेरी अंडी' घालणारी राजहंसी कशी आहे हे पोस्टातल्या, शाळांतल्या आणि अन्य मोर्चेवाल्यांना ऐकवीत आहेत. त्यासाठी त्यांनी तूर्तास तरी 'राज्य शासन' (अर्थातच लोकशाहीतले) ही एक संयुक्त जवाबदारी असते, यशाप्रमाणेच अपेक्षाचे दायित्व हीही एक सामुदायिक जवाबदारी असते. लोकशाहीत (पक्षीय) पक्ष व पक्षांतर्गत नेतृत्व हे डावलता येत नाही वगैरे गोष्टींना फारसे महत्त्व न देण्याचे धोरण स्वीकारलेले दिसते. गेल्या वीस वर्षात ज्या काँग्रेसच्या त्या अध्यक्ष होत्या, ज्या पंतप्रधानांच्या त्या कन्यका होत्या व आहेत त्या पक्षाकडून व शासनाकडून कोटयवधी परकीय पैसा वापरून (व बराचसा उधळूनही) व सर्व प्रकारचे कर लादून 'पीपल्' कडून (इंदिराजींचा प्रिय शब्द) पैसा वसूल करूनही जो 'चमत्कार' घडला नाही तो चमत्कार ही 'राजहंसी' करणार आहे आणि काँग्रेसमधले हे प्रतिगामी सिंडिकेटवाले व मोरारजी हे ह्या 'चमत्कारा'वर फुंकर मारण्यासाठी टपलेले असल्याने त्यांना बाजूला सारून मी 'पीपल्' (ओ ! पूअर पीपल्)-साठी त्यांच्यात येऊन उभी राहिले आहे असाही एक आभास त्या निर्माण करू पहात आहेत. त्यासाठी त्यानी आपल्याच पक्षातल्या विविध माणसांवर सतत शरसंधान चालवले असून 'सत्ते'साठी 'लाल' गटाशी काहीशी दोस्तीची भूमिका स्वीकारलेली दिसते आहे. आज तरी असे दिसते की, इंदिराजींच्या ह्या नव्या व विद्युत्प्रवाही राजकारणाला त्यांच्याच पक्षापेक्षा 'लाल' गोटात अधिक लोकप्रियता लाभली असून त्यासाठी लाभणारी प्रत्येक संधी लाल मंडळी उठवीत आहेत. 'पीपल्'साठी कळवळून बोलणाऱ्या इंदिराजीना नेहरू-शास्त्री रहात असत ते निवासस्थान चालणार नसून त्यांच्यासाठी चाळीस लाखाचे एक नवे, आलिशान निवासस्थान आता दिल्लीत बांधले जाणार आहे. (पीपल्, प्लीज नोट ! ) पण तरीही आमचे काही म्हणणे नाही ! ह्या महान देशाच्या पंतप्रधानाने त्या इतमामाने रहावे. पण काचेच्या घरात राहून इतरांच्या काचघरावर धोंडे फेकू नयेत. गेल्या वीस वर्षात कोटयवधी रुपयांची परकीय कर्जे तुम्ही घेतलीत, वाटेल ते व तसे कर लादलेत, पंचवार्षिक योजना आखल्यात, 'समाजवादा'चा गायत्री मंत्र तर पहिल्या वर्षीपासून जपत आलात. १९६७ पर्यंत जनतेने तुम्हाला ह्या देशात एकछत्री राज्य करू दिले. माणसे बदलून योजना अडतात. म्हणून पंडितजींच्या हिमालयीन चुका पोटात घातल्या व अखेरपर्यंत श्रद्धा वाहिली. चीन-पाक आक्रमणाच्या काळात रक्त, पैसा, घाम समर्पित करून देशाची 'शान' सांभाळण्याचा प्रयत्न केला आणि तरीही समाजवादाचा, सुवत्तेचा, सुराज्याचा सूर्य उगवलाच नाही ही कटु असली तरी वस्तुस्थिती आहे. महागडे शासन, लाच-लुचपतीने व वशिलेबाजीने पोखरलेले शासन, सत्तानिष्ठ शासन, परोपदेशे पांडित्य शिकवणारे शासन, बाहेर सतत लाथा खाणारे व घरच्याना लाथा देणारे शासन, अर्थकारणात 'तोल' न राखू शकणारे शासन अशीच कीर्ति गेल्या वीस वर्षात शासनाने संपादन केली आहे. 'पीपल्'च्या तोंडचे घास काढून आम्ही अनेक निष्क्रीय व निरुपयोगी असे 'विदेशी' वकिलातीचे पांढरे हत्ती पोसले आहेत. संकटात शत्रु-मित्रांची पारख होते. चीन-पाक युद्धाचे वेळी शत्रु-मित्र पारखले गेले. तरीही आम्ही ते पांढरे हत्ती पोसतोच आहोत. आणि ह्या साऱ्याची खंत वाटायच्या ऐवजी आम्ही आता लोकांनाच सांगतो आहोत की, बँकांचे राष्ट्रीयीकरण केले की (जणु) साऱ्या समस्या सुटतील. सुटोत ! तेच तर आपणा साऱ्यांचे स्वप्न आहे. पण त्यासाठी ह्या देशाच्या एकूण राजकारणाने जो रंग घेतला आहे तो मात्र चित्य आहे. राष्ट्रपतीच्या निवडणुकीबाबत 'संजीव रेड्डी' यांची निवड झाल्यावर पंतप्रधानांनी जी आदळआपट केली ती खचितच शोभादायक नव्हती. लोकशाहीत व्यक्ति कितीही मोठी असली तरी पक्ष हा तिच्याहून नेहमीच मोठा असतो. आणि पक्षाहून अखेर राष्ट्र मोठे असते. 'झाकीर तत्व' जर पंतप्रधानांनी स्वीकारले असते व गिरीना ते पद देऊ केले असते तर वादंग टळले असते (मूळातच) ! पण 'रेड्डी' निवडीनंतर त्यांनी जी पावले टाकली आहेत ती पक्षापेक्षा 'व्यक्ति' श्रेष्ठ असा दावा मांडणारी आहेत. 'डिक्टेटर' म्हटल्याबद्दल त्यांना राग आला आहे. पण 'मोरारजी'चा बळी ज्या पद्धतीने घेतला गेला ती पद्धत फसली आहे ! राष्ट्रीयीकरणाला (तावडतोबीच्या) पक्ष वा मंत्रिमंडळाचा पाठिंबा होता ! असलाच तर मग तसा ठराव प्रत्यक्ष रूपाने बंगलोरला का आणला नाही ? रेड्डी निवडीचे परिणाम म्हणूनच मोरारजींची राजकीय हत्या झाली व चौदा बँकांचे राष्ट्रीयीकरण अवतरले ही सत्य गोष्ट आहे. राष्ट्रीयीकरणाचे तत्व वाईट नाही (तसे कोठले तत्व 'तत्त्व' म्हणून वाईट असते ?) त्याला ह्या देशातील सध्यस्थिती अनुकूल नाही येवढेच अर्थतज्ञांचे म्हणणे होते. रिझर्व बँकेचे माजी गव्हर्नर व विख्यात अर्थतज्ज्ञ म्हणूनच चिंतामणराव देशमुख यांना देश ओळखतो. रिझर्व बँकेचे माजी गव्हर्नराप्रमाणेच चालू गव्हर्नरांनीही बँकांच्या राष्ट्रीयीकरणाबाबत प्रतिकूल अभिप्राय दिला



अनुक्रमणिका




होता. परंतु 'विरोधी मत' म्हणजे 'देश-हितशत्रूंचे मत' असे समीकरण मांडण्याची कॉंग्रेसवाल्यांना सतत सवय असल्याने इंदिराजींनी साऱ्यांनाच 'मोरारजी' पंथात बसवले. आज राष्ट्रीयीकरण ही सिद्ध व वैध गोष्ट झाली आहे. तपशील ठरायचा आहे. ठरेल. परंतु स्वराज्यातले सारे कटु अनुभव तपशीलावावतचेच नाहीत काय? राष्ट्रपतीच्या निवडणुकीवावतचे पवित्रे-प्रति पवित्रे टाकण्यात येत आहेत. तिथेही कॉंग्रेसपक्ष किती एकात्म भावनेने उभा राहील, शंका वाटते आहे. केरळ, बंगालमध्ये कम्युनिस्ट राजवटीनी ह्या देशाच्या सार्वभौम घटनेलाच चूड लावण्या-साठी यथाशक्ति प्रयत्न चालविले आहेत. नंवुद्रीपाद-गोपालन यांनी तर उघड उघड तशी वक्तव्ये केली आहेत. त्यांना दिल्लीचे समन्स काढले गेले, तेव्हा 'इंदिरा कृपा' जाहली अशी वार्ता आहे. बंगालचे शासनही गृहमंत्र्यांना न मानता परस्पर इंदिराजींशी संपर्क साधते. राष्ट्रपति म्हणून कुणीही आला तरी शासकीय प्रमुख म्हणून तो राहील पण त्या निमित्ताने ह्या देशातील सर्व डाव्या शक्ति एकात्म होऊन जर 'नक्सल-वादी' क्रांतीची पावले टाकू लागली तर लोकशाही, वॅंकांचे राष्ट्रीयीकरण, नवी पंचवार्षिक योजना ह्या साऱ्या गोष्टींचे अस्तित्वच मुळी धोक्यात येईल. 'राष्ट्रीयी-करण' या विषयावर कॉंग्रेसमध्ये यत्किं-चितही मतभेद नसताना ज्या हुकूमशाही पद्धतीने व राजकीय कारणाने ते घडवून आणले गेले त्यामुळे देशाला स्थिर शासन देऊ शकणाऱ्या एकमेव अशा कॉंग्रेस पक्षात आज तरी वेकीची वीजे रुजली आहेत. राष्ट्रीयीकरण हे वरदान ठरण्यासाठी सुद्धा ह्या देशाला लोकशाहीनिष्ठ, जनता-भिमुख, एकात्म, पक्षशिस्तीवर श्रद्धा असणाऱ्या आणि ह्या साऱ्याहूनही मह-त्त्वाचे म्हणजे ह्या देशावर मातृवत् प्रेम करणाऱ्या पक्षाचे एकसंध शासन अस-ण्याची गरज आहे. डावे-उजवे ही बिरुदे सापेक्ष आहेत; पण देशभक्त हे विरुद मात्र खरे आहे. ह्या साऱ्यानी हे भावी संकट ओळखले पाहिजे. एका प्रांतात अशी राज-वट निर्माण झाली तर ती किती कटकटी निर्माण करू शकते हे केरळ-बंगालने दाख-वले आहे. आज तरी कांग्रेसमधील सत्ता-संघर्षाने जे स्वरूप धारण केले आहे ते पाहिले की, अंतर्गत फूट व भेदनीतीवरच क्रांतीच्या पोळ्या भाजून घेणाऱ्या कम्यु-निस्टांनी जयकाराचे जल्लोष कां चाल-विले आहेत याची संगति लागते. "पॉवर अॅट ऑल् कॉस्ट" असे इंदिराजी एका उ. प्र. खासदार स्त्रीजवळ म्हणाल्याचे वृत्त आले होते. तें खरे असेल तर वरे नाही! डेमॉक्रसी अॅट ऑल् कॉस्ट! इंडिपेंडन्स अॅट ऑल् कॉस्ट! वाटेल ती किंमत देऊनही आम्ही भारताचा 'झेकोस्लाविया' होऊ देणार नाही हे वजावण्याची वेळ आली आहे. व्यक्ति मोठी असली तरी पक्ष त्याहून मोठा आहे. आणि पक्ष मोठा असला तरी पक्षाहून देश मोठा आहे. हे गांधी-नहरूंना न वजावल्याने १९४७ पासून १९६९ पर्यंत सतत भूसंकोच होत गेला. जवर किंमत देशाने मोजली आहे. आता आतूनच भिंती ढासळत आहेत. सावध! सावध!!

—सारस्वत

[ पृष्ठ १० वरून–प्रा. ना. सी. फडके ]

"सिगारेट ओढणार?"
"नाही!"
"मग काय पान घेणार?"
"नको."

"वाः तुम्ही सिगरेट ओढत नाही अन् पानही खात नाही. आश्चर्य आहे."

तेवढ्यात अंजलीने मध्येच विचारले, "अप्पा, चहा सांगायचा का?"

"ताटके, चहा तरी घेता ना?"
"चहा घेतो."
"आण चहा."

अन् मग आमच्या गप्पांना सुरुवात झाली. ते अन्यांचे कौतुक करीत होते. 'स्वामी' कादंबरी त्यांना आवडली नाही ही गोष्टही त्यांनी स्पष्टपणे सांगितली. अन् मग ते मला म्हणाले—

"काय हो ताटके, तुम्ही ठाण्याला रहात असून तुमची प्रकृती अगदी छान दिसतेय. ठाणं काही हवेसाठी प्रसिद्ध नाही."

"आरोग्याचा वारसा मला आई-वडिलां-कडून मिळालाय."

आमच्या गप्पा रंगत असतानाच मी त्यांना विचारलं—

"तुमचा मी वराच वेळ घेतोय."
"वेशक घ्या."

"पण तुम्ही तर वेळेच्या बाबतीत फारच काटेकोर आहात असा तुमचा लौकिक मी ऐकतोय."

"खरा आहे तो. पण तुम्ही मला कळ-वून आला आहात. अन् म्हणून मी तुमच्या-साठी पुष्कळ वेळ राखून ठेवलाय. पुष्कळ लोक न कळविता येतात. मी कामात असतो. त्यामुळं तेवढ्यापुरते वोलून मला त्यांना निरोप द्यावा लागतो. त्यामुळंच माझ्याविषयी बरेच गैरसमजही पसरतात."

स्वच्छ परीटघडीचा शर्ट, अंगात कोट, पांढरेशुभ्र धोतर, दाढी केल्यामुळं तुकतुकीत असा प्रसन्न चेहरा अन् हातात सिगरेट अशा थाटात फडके माझ्याशी अगदी मोकळे-पणाने वोलत होते अन् पुण्यात आल्यावर न चुकता भेटण्याचे निमंत्रणही देत होते. या भेटीला वरेच दिवस लोटले असले तरी ती मला अगदी कालच झाल्यासारखी वाटते.

मी पाहिलेले फडके असे आहेत. माझ्याशी ते अगदी घराऊ भाषेत बोलले. मित्राशी वोलावे त्याप्रमाणे. 'साहित्यिक' पदवीचा त्यांना अभिमान आहे. तिच्या अभिमानासाठी ते कुणाशीही तडजोड करणार नाहीत. मनाला पटेल ते लिहा-यचे असा त्यांचा बाणा आहे. १९२९ साली बेळगांवच्या साहित्य संमेलनात शिवराम-पंत परांजप्यांनी 'कादंबऱ्यांची दौलत उध-ळणारे जादूगार' असे त्यांचे वर्णन केले ते अगदी यथार्थ आहे. ते श्रेष्ठ कादंबरीकार असले तरी हरीभाऊ आपटेयांबद्दलही त्यांच्या मनात सदैव आदराचीच भावना असते. म्हणून मराठीच्या या ज्येष्ठ काद-बरीकाराच्या अमृतोत्सवाच्या प्रसंगी माझ्या ओठातून अ. ना. देशपांड्यांच्या त्यांच्या संबंधीच्या पुढील काव्यपंक्ती नकळतपणे बाहेर पडतात—

मराठीतली ललितकथा ही हरीभाऊंनी वाढविली.
वात्सल्याची, हितदृष्टीची माया तिज़वर पांघरली.
यौवनप्रांती पद ठेवी ती जडली संगत गोड तुझी
जादूगार तूं तव सहवासीं खूपच खुलली कळी तिची ॥

● ● ●








REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment SEPTEMBER 1969

DIPAVALI MONTHLY



Cover Printed At Asha Printery, Bombay-4.

अनुक्रमणिका






